 Regd. No. M H 1332

# नवभारत

या अंकात –




वर्ष २७

अंक सातवा

एप्रिल १९७४

पृ. १–२८










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे
अंक सातवा

# नवभारत

एप्रिल १९७४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘नवभारत’ मासिक, C/O दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका








डॉ. र. चिं. वडवे

# समाजवादी धर्तीची समाजरचना :२:

## ( उद्दिष्ट व फलित )

### १ ली पचवार्षिक योजना ( १९५१ ते १९५६ )

दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर अल्पावधीतच भारत स्वतंत्र झाला. सत्तेचे उदक आपल्या नेत्यांच्या हातावर सोडून, म्हणजेच जनता व देश यांच्या सर्वांगीण उन्नतीची संपूर्ण जबाबदारी त्यांच्यावर सोपवून ब्रिटिशांनी स्वदेशी प्रयाण केले. देशाची फाळणी व महायुद्धोद्भूत चलनवृद्धि इ. यातून उत्पन्न झालेल्या अनेक समस्यांना शासनाला सुरवातीपासूनच तोंड द्यावे लागले. जनतेचे रहाणीमान सुधारणेही निकडीचे होते. पंचवार्षिक योजना आखून या सर्व प्रश्नांना यशस्वीपणे तोंड द्यावे व प्रगतीचा गाडा पुढे न्यावा ह्या विचाराने १ ली पंचवार्षिक योजना आखण्यात येऊन तिची कार्यवाही १९५१ पासून चालू करण्यात आली व १९५६ ला ती संपून दुसऱ्या योजनेस प्रारंभ झाला. पहिल्या ( १९५१–५६ ) योजनेचे प्रमुख उद्दिष्ट असे होते की तत्कालीन गरजा व उपलब्ध साधने लक्षात घेऊन त्वरित व संतुलित आर्थिक विकास घडवून आणण्याच्या दृष्टीने अर्थव्यवस्था बळकट करणे व भविष्यकालीन अर्थविकासाचा मार्ग सोपा करणे. चलनवृद्धि व फाळणी यामुळे उत्पन्न झालेल्या प्रश्नांची सोडवणूक करणे हेही उद्दिष्ट होतेच. समाजवादाचा मात्र त्यात अप्रत्यक्षसुद्धा उल्लेख आढळत नाही. या योजनेच्या अखेरीस राष्ट्रीय उत्पन्नाच्या ७% गुंतवणूक होऊन धान्य, वीज, जलसिंचन, खते, औद्योगिक उत्पादन, नवीन शासकीय उद्योग इत्यादींत बरीच समाधानकारक वाढ झाली. राष्ट्रीय उत्पन्न १८% नी वाढले. बाजारभाव सरासरीने १३% खाली आले. थोडक्यात म्हणजे योजनेच्या शेवटी देशाची आर्थिक स्थिती सुरवातीपेक्षा अधिक बरी झाली. असे असले तरी ही फक्त सुरवात होती. शिवाय नियोजनाचा मुख्य उद्देश फक्त उन्नतीचा अमूक बिंदू गांठण्याचा नसून देशाच्या अर्थव्यवस्थेत







गतिमानता उत्पन्न करून ती अधिकाधिक उन्नत होत जाईल व त्यायोगे सर्वसामान्य जनतेचे रहाणीमान, तसेच बौद्धिक व सांस्कृतिक जीवन उंचावत जाईल असे करणे हा असावयास हवा याची जाणीवही योजनेअखेर पक्की झाली. देशातील अनेक लहान मोठे प्रदेश इतर काही प्रदेशांपेक्षा खूपच मागसलेले असून त्यांतील रहाणीमानही फारच खालच्या पातळीवर आहे व काहींना तर आधुनिक विचार व तंत्र यांचा स्पर्शही झालेला नाही म्हणून यापुढील नियोजनात जनता सर्व प्रकारे प्रयत्नशील बनून सहभागी होण्याची तीव्र निकड आहे ही जाणीवही उत्पन्न झाली. रहाणीमान सुधारण्याचे महत्व मोठे असले तरी अंती ते बौद्धिक व सांस्कृतिक जीवन सुधारण्याचे व सामाजिक मूल्यांच्या संवर्धनाचे साधनच होय, हे लक्षात घेऊन पहिल्या पंचवार्षिक योजनेची कार्यवाही होत असतानाच नियोजनाचे उद्दिष्ट अधिक स्पष्ट स्वरूपात निश्चित करण्याचे कार्यही हाती घेण्यात आले. औद्योगीकरणासंबंधीचे शासकीय धोरण व त्यावर पं. नेहरूंनी वेळोवेळी केलेल्या भाष्यात उद्योगधंद्यांवर वाढती नियंत्रणे व मालकी यांचा पुरस्कार दिसून आला. हा समाजवादाचा ओनामाच होता. नंतर १९५४ च्या औद्योगिक धोरणासंबंधीच्या लोकसभेच्या प्रस्तावात व जानेवारी १९५५ च्या आवडी येथील राष्ट्रीय सभेच्या ६० व्या अधिवेशनात 'समाजवादी धर्तीची समाजरचना' निर्माण करण्याच्या ध्येयाचा स्पष्टपणे उद्घोष केला गेला. हे धोरण पुरस्कारताना प्रत्येकाला समान संधी व राजकीय, सामाजिक व आर्थिक हक्क यावर आधारलेली सहकारी पद्धतीची समाजरचना (cooperative commonwealth) स्थापन करण्यावर व यामुळे राष्ट्रीयसभा आपल्या धोरणापासून यत्किंचितही विचलित होत नाही हे स्पष्ट करण्यावर पं. नेहरूंनी मुद्दाम भर दिला. या सर्व घोषणात व्यक्त झालेले ध्येय वा उद्दिष्ट अतिशय उत्तुंग स्वरूपाचे असले व त्या करणाऱ्यांची त्यामागील जनहिताची तळमळ वादातीत असली तरी प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीने त्यातून विशेष मार्गदर्शन मिळू शकत नाही अशी टीका अनेक जाणत्यांकडून करण्यात आली. परंतु तिची फारशी दखल न घेताच पुढील योजना आखण्यात आल्या इतके इथे नमूद करायला हवे.

### दुसरी पंचवार्षिक योजना (१९५६ ते ६१)

'समाजवादी धर्तीची समाजरचना' हे उद्दिष्ट स्पष्टपणे नमूद करूनच ही योजना आखण्यात आली. राष्ट्रीय उत्पन्न व नोकऱ्या यात दिसून येण्याजोगी वाढ करण्याबरोबरच आर्थिक व समाजजीवनात अधिकाधिक समानता

अनुक्रमणिका

उत्पन्न करणे जरूर असल्याचेही तीत मान्य करण्यात आले. राष्ट्रातील वाढत्या संपत्तीचा लाभ समाजातील उपेक्षित विभागाना उपलब्ध करून देणे व त्यायोगे विषमता कमी करणे हे साध्य होणे असेल तर खाजगी उद्योगांना वाव ठेवूनही शासकीय क्षेत्रातील उद्योग वाढवून आर्थिक क्षेत्रावर शासनाचे वर्चस्व वाढले पाहिजे व नव्या समाजरचनेचे मूळ देशातील परिस्थितीशी सुसंगत अशा पद्धतीनेच वाढविले पाहिजे. त्यात प्रयोगांनाही वाव हवा व देशातील उत्पादनावर अनिष्ट परिणाम होणार नाही याचीही दक्षता घ्यावयास हवी. हे सर्व मुद्दे लक्षात घेऊन योजनाकारांनी दुसऱ्या योजनेची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे नमूद केली आहेत :

१) राष्ट्रीय उत्पन्नात वाढ व तद्द्वारा देशातील राहणीमान उंचावणे.
२) मूलभूत व जड उद्योगांना प्राधान्य देऊन राष्ट्राचे औद्योगीकरण करणे.
३) नोकऱ्यांच्या संख्येत मोठी वाढ घडवून आणणे.
४) उत्पन्न व संपत्तीतील विषमता कमी करून आर्थिक सत्ता विकेंद्रिणे.

योजनाकारांनी असेही नमूद केले आहे की वरील चवथे उद्दिष्ट साध्य करण्याचे प्रयत्न लोकशाही शासन असलेल्या देशात कोठेही फारसे झालेले नसल्याने या बाबतीत आपल्याला स्वतंत्ररित्याच मार्ग काढला पाहिजे. मालमत्तेच्या खाजगी मालकीमुळेच मुख्यत: विषमता उत्पन्न होत असल्याने ती नष्ट अथवा कमी करण्यासाठी दोन्ही आघाड्यांवरून हल्ले करण्याची ( म्हणजेच वरच्या गटांचे उत्पन्न कमी करणे व खालच्यांचे वाढविणे. ) आवश्यकताही योजनेत प्रतिपादिली आहे. हे सर्व लोकशाही मार्गाने साधण्यावरही योजनाकारांनी भर दिला आहे.

पहिल्या योजनेत विविध जलसिंचन योजनांना प्राधान्य दिले असून दुसऱ्या योजनेत औद्योगीकरण व जड उद्योगांना महत्त्वाचे मानण्यात आले आहे. आपल्या विवेचनाच्या दृष्टीने दुसऱ्या योजनेतील तिसरे व चवथे विशेषत: चवथे उद्दिष्ट महत्त्वाचे आहे हे मुद्दाम सांगण्याची जरूर नाही. औद्योगीकरणामुळे मोठ्या प्रमाणात नोकऱ्या उत्पन्न होऊन बेकारी हटेल व विषमता कमी करण्याने समाजवादाचे पाऊल पुढे पडेल अशी अपेक्षा व्यक्तविण्यात आली होती. योजना-काळात लोकसंख्या १.२ ते १.५ अशा प्रमाणात वाढेल असे गृहीत धरून नोकऱ्यासंबंधी सर्व हिशोब केला होता. विषमता कमी करण्यासाठी वाढत्या उत्पन्नावर वाढते कर बसविण्याची

व्यवस्था होती. हे सर्व कागदावर ठीक दिसले तरी योजना पूर्ण होण्याच्या वेळी प्रत्यक्ष अनुभव मात्र निराळाच आला. नोकऱ्यांची संख्या वाढली तरी लोकसंख्या अपेक्षित प्रमाणाच्या सुमारे दुपटीने वाढत गेल्याने बेकारांच्या संख्येत अंती वाढच झाली. वाढते कर बसविण्यात आले तरी आर्थिक समानतेकडे वाटचाल न होता विषमतेलाच खतपाणी मिळाल्याचा अनुभव आला. खालच्या थरांना योजनांचा लाभ मिळण्याची अपेक्षा मृगजळवत ठरली. उलट आर्थिक विषमता डोळ्यात भरण्याइतकी वाढल्याने पं. नेहरूंना योजनेतील दोष विशेष खटकले; इतके की योजनांचा फायदा प्रत्यक्षतः कोणाच्या पदरात पडला याची चौकशी करण्यासाठी एक समिती नेमण्याचे त्यांनी प्रकट केले. अशी समिती नेमली गेली की नाही व नेमली गेली असल्यास तिच्या प्रतिवृत्तात कोणत्या गोष्टी उजेडात आल्या ही बाब गुलदस्तातच राहिली. निदान माझ्या कानावर तरी ते आले नाही. जनतेचे उत्पन्न रुपयांच्या स्वरूपात वाढलेले दिसले तरी भाववाढीलाही गती मिळत गेल्याने सामान्य जनतेची आर्थिक स्थिती सुधारली नाही. बहुधा ती खराबच होत गेली. योजनेच्या कार्यवाहीमुळे वाढलेल्या राष्ट्रीय उत्पन्नाचा लाभ खालच्या थरांपर्यंत पोचलाच नाही. पहिल्या दोन योजनांमुळे या उत्पन्नांत ४२%, तसेंच दरडोई उत्पन्नांत २०% वाढ झाली. ही वाढ अगदीच क्षुल्लक म्हणतां येत नाही व म्हणूनच तिचा लाभ थोडयाफार प्रमाणांत तरी या थरांपर्यंत पोचावयास हवा होता यांत शंका नाही. परंतु तसे घडले नाही. याचा स्पष्ट अर्थ असा की योजनेची इतर उद्दिष्टें साध्य झाली असोत वा नसोत समाजवादाच्या दिशेने वाटचाल मात्र मुळीच झाली नाही. विषमतेच्या दरीची रुंदी कमी झाली नाही. खालचे थर जराही वर आले नाहीत. सामाजिक विषमतेबद्दलही असेच म्हणावे लागेल. योजनेचे चवथें उद्दिष्ट अजीबात दुर्लक्षित राहिले अथवा डावलले गेले. समाजवादी धर्तीची समाजरचना निर्मिण्याच्या प्रतिज्ञेने आखल्या केलेल्या योजनेची ही फलश्रुति अतीशय खेदजनक होय. विषमता कमी करून समाजवाद प्रस्थापिण्याच्या घोषणा खरोखरच मनापासून करण्यात आल्या होत्या की निवळ सामान्य लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठी असा संभ्रम उत्पन्न होण्याइतकी ही फलश्रुति निराशाजनक आहे. जनतेच्या मतांवर लोकसभा व राज्यसभा यांत निवडून गेलेल्या प्रतिनिधींनी हे कसे होऊ दिले यांचे आश्चर्य वाटते. त्यापैकी बहुतेकांना देशाचा गाडा कोठे चालू आहे हेच कळले नसावे.

'Problems in the Third Plan' (A critical miscellany) या सरकारी प्रकाशनात डॉ. गॅनचंद यानीं लिहिलेल्या 'Soical

Purpose in Planning' या लेखात वरील मुद्यावर विदारक प्रकाश टाकण्यात आलेला आहे. त्याचा सारांश असा –

१) सर्वसामान्य जनतेला पंचवर्षीय योजनांचे मूलभूत स्वरूप व त्यांचे तिच्या दैनंदिन गरजा, कल्याण व समस्या यांच्याशी असलेले संबंध यांचे बौद्धिक आकलनच झाले नाही. या योजना आंखण्यात व कार्यवाहीत आणण्यात तिचा फारसा भाग नव्हता. स्वाभाविकपणेच त्यांच्या कार्यवाहीसाठी जनतेचे सहकार्य मिळविण्यात शासनाला अपयश आले.

२) राष्ट्रीय व दरडोई उत्पन्नांत वाढ होत गेली व आयकर मृत्यूकर, इ. मार्गांनी विषमता कमी करण्याचे प्रयत्न झाले तरीही चलनवृद्धि व त्यामुळे होणारी भाववाढ इतकी तीव्र होती की योजनांमुळे मोठ्या बहुसंख्य जनतेच्या जीवनात कोणतीही सुधारणा झाली नाही. अनेकांची स्थिती खरे पहाता खालावलीच.

३) देशात वैफल्य व निराशेचे वातावरण वाढत असून योजना यशस्वी करण्याबाबत शासनांच्या कर्तृत्वावरील जनतेची श्रद्धा झपाट्याने नष्ट होत आहे. कारण गरजेच्या मानाने मिळविलेले यश अगदीच अपुरे होते. तसेच जी सामाजिक उद्दिष्टे साधण्यासाठी योजना राबविण्यात आल्या ती उद्दिष्टे साध्य झाली नाहीत.

४) शेतीचे उत्पादन वाढले तरी स्वतःची जमीन नसलेल्या असंख्य शेतमजुरांची स्थिती यत्किंचितही सुधारली नाही व त्यांच्यातील बेकारी जराही हटली नाही हीच स्थिती औद्योगिक कामगारांची. साहजिकच त्यांनी राष्ट्रीय उत्पन्न वाढविण्याच्या कार्यांत विशेषसा भाग घेतला नाही अथवा घेणे त्यांना शक्य झाले नाही.

५) दहा वर्षांच्या नियोजनानंतरही म्हणण्यासारखे सामाजिक स्थित्यंतर अथवा परिवर्तन झाले नाही. यामुळे नैतिक अधःपात व सामाजिक मूल्यांची उपेक्षा इतकी शिगेला पोचली की ही अवनती योग्य त्या उपायांनीं रोखली नाही तर मोठी आपत्ति कोसळणे अपरिहार्य ठरेल.

६) शासकीय नोकरवर्ग व कामगार यांनी सर्वंकश समाजवादाचे ध्येय स्वीकारलेले दिसत नाही. यामुळेच आंखून दिलेले धोरण किती सद्हेतुयुक्त असले तरी त्याला अपेक्षित फळे आली नाहीत.

चलनवृद्धीमुळे सर्वांत मोठा फटका बसला तो मध्यमवर्गाला. त्यामुळे त्यांच्यात धुमसत असलेला असंतोष भावी परिणामांच्या दृष्टीने भयावह ठरेल.

थोडक्यात म्हणजे समाजवादाकडे वाटचाल कितपत झाली हे पाहता दुसऱ्या योजने-अखेरीस एकंदरीने परिस्थिती अंधकारमयच होती. म्हणूनच नियोजनाला काही काळ विश्रांती देण्याच्या सूचना पुढे आल्या. प्रकाशाचा किरण इतकाच होता की शासनाला या अपयशाची जाणीव झाली होती. व ती व्यक्तविण्याइतपत मनाचा मोठेपणाही होता.

तिसरी पंचवार्षिक योजना- (१९६१-६६)

तिसऱ्या योजनेची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे नमूद करण्यात आली आहेत -

१) राष्ट्रीय उत्पन्नात दरसाल ५% वाढ.
२) अन्नधान्याच्या बाबतीत स्वयंपूर्णता; तसेच उद्योगधंदे व निर्यातीसाठी जरूर तितकी शेती-उत्पादनात वाढ.
३) पोलाद, वीज, जळण इ. संबंधीच्या मूलभूत उद्योगधंद्याचा अशा प्रकारे विस्तार की ज्यायोगे पुढील दहा वर्षांत देश या बाबतीत स्वयंपूर्ण होईल.
४) मानवशक्तीचा पूर्ण उपयोग व नोकऱ्यांच्या संख्येत म्हणण्याजोगी वाढ.
५) उत्पन्न व संपत्तीतील विषमता कमी करून आर्थिक सत्तेचे विकेंद्रीकरण.

दुसऱ्या योजनेप्रमाणेच याही योजनेत शेवटचे उद्दिष्ट समाजवादाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. सध्याची विषमता कमी करून त्याचबरोबर विकासाला गती देण्यावर येथेही भर देण्यात आलेला आहे. त्यासाठी दुसऱ्या योजनेपासूनच अनेक उपायांचा अवलंब करण्यात आला असून हेच कार्य अधिक तडफेने पुढे चालविण्याची मनीषा तिसऱ्या योजनाकारांनी व्यक्तविली आहे.

हे उपाय थोडक्यात असे-

१) जमीन सुधारणा तसेच जमीन धारणेला कमाल मर्यादा घालून त्यायोगे अनेक शेतमजुरांना जमिनीचे मालकी अधिकार प्राप्त करून देणे.
२) दुष्काळी प्रदेशात व इतरत्रही जलसिंचनाच्या योजना कार्यवाहीत आणून आर्थिकदृष्टया मागासलेल्या विभागातील जनतेचा रहाणीचा दर्जा उंचावणे.
३) नोंदीत किंवा वर्गीकृत जाती-जमातीच्या तसेच मागासलेल्या वर्गाच्या कल्याणासाठी विविध प्रकारांच्या योजनांना मूर्तस्वरूप देणे.
४) ५-११ या वयांतील मुलांसाठी प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करणे. आर्थिकदृष्टया मागासलेल्या वर्गातील मुलांच्या शिक्षणासाठी जरूर तितक्या शिष्यवृत्त्या ठेवणे.
५) आरोग्य केंद्रे, पिण्याच्या पाण्याच्या सोयी व इतर मूलभूत सुविधा सार्वत्रिक करणे. हिवतापादि रोगांच्या निर्मूलनाची व्यवस्था करणे.

६) स्त्रिया व मुलांसाठी समाजसेवेची केंद्रें स्थापणे.

७) मागसलेल्यांना कामे मिळण्याची संधी उपलब्ध करून देणे.

८) ज्यांना शक्य आहे त्यांच्याकडून अधिकाधिक प्रमाणात करवसूली करणे.

योजनेच्या खडर्यावर बोलताना राज्यसभेत पं. नेहरू म्हणाले की आपले प्रश्न सोडविण्याचा सर्वोत्तम मार्ग म्हणूनच नव्हे तर नैतिक दृष्टीनेही श्रेष्ठमार्ग म्हणून समाजवादावर माझी श्रद्धा आहे. याच भाषणात त्यांनी असेही सांगितले की दोन पंचवार्षिक योजनांमुळे संपत्ति वाढली आहे. लोकांची स्थिती सुधारत आहे, त्यांना अधिक चागले अन्नवस्त्र मिळत आहे यात शंका नाही. परंतु तरीही ज्यांना योजनांचा लाभ जराही मिळाला नाही. ज्यांच्या स्थितीत काहीही सुधारणा झाली नाही अशांची संख्याही फार मोठी आहे. नियोजनाला काही काळ विश्रांति द्यावी या सूचनेचा उल्लेख करून ते पुढे म्हणाले की ते शक्य नाही. आपण वाघावर आरूढ झालेलो असून त्यावरून खाली उतरता येणार नाही. तसे केल्यास तो वाघ आपल्याला गिळंकृत करील. लोकसंख्या वाढत असल्याने प्रगतीला अधिक गति देणे हाच एकमेव पर्याय आपणाला उपलब्ध आहे.

वर उल्लेखिलेल्या शासकीय प्रकाशनातील आपल्या लेखात श्री. व्ही. के. आर. व्ही. राव यांनी तिसऱ्या योजनेच्या मसुद्यावर अतिशय विदारक टीका करून तिच्यातील मूलभूत उणीवा स्पष्ट केल्या आहेत. ते म्हणतात की, या योजनेच्या बुडाशी निश्चित असे ध्येय नाही; समाजवादाचा त्यात नामनिर्देशही नाही; पहिल्या दोन योजनांच्या कार्यवाहीनंतर समाजवादी समाजरचनेच्या दिशेने प्रगती कितपत झाली याचा आढावा न घेताच ती तयार करण्यात आलेली दिसते; समाजवादी धर्तीची समाजरचना या ध्येयधोरणात समाजातील असंख्य गरीब माणसांच्या गरजा व समस्या यांच्या विचाराऐवजी एकंदर समाजाच्या कल्याणाचाच विचार महत्व पावलेला दिसतो; सामाजिक, आर्थिक व राजकीय सत्तेत मूलभूत स्वरूपाचे बदल आवश्यक आहेत त्याची जाणीव त्यात दिसून येत नाही; विषमता कमी करण्याच्या धोरणाला बहुधा हेतुतः शेवटचे स्थान देण्यात आलेले आहे; अशा स्थितीत योजनेच्या यशस्वितेसाठी अत्यावश्यक असलेले जनतेचे सहकार्य न मिळाल्यास आश्चर्य कोणते? राष्ट्रीय सभेचा दृष्टिकोनच डावीकडून उजवीकडे वळला आहे असा तर याचा अर्थ नाही ना? अशा प्रकारे या आराखड्याचे वाभाडे काढून श्री. राव शेवटी म्हणतात की नुसते दरडोई सरासरी उत्पन्न वाढविण्याचे धोरण अगदी अपुरे असून प्रत्येक

कामकऱ्याला किमान अमुक इतक्या वेतनाची हमी देण्याची पुस्ती त्याला जोडली पाहिजे. या योगेच केवळ जनतेत योजनेविषयी उत्साह उत्पन्न होऊन तिचे गतिमान सहकार्य मिळू शकेल. श्री. राव यांचा हा मुद्दा अतिशय महत्वाचा आहे. मात्र समाजवादाच्या दृष्टीने तोही खरे पाहता अपुराच आहे असे मला वाटते. प्रत्येक धडधाकट व्यक्तीला काम व किमान अमुक रोजगार मिळण्याची हमी देण्यात आली म्हणजे हा अपुरेपणा दूर होऊन समाजवादाकडे आपली खरीखुरी वाटचाल चालू होईल.

तिसऱ्या योजनेची कार्यवाही अगदी बेताबेतानेच झाली व समाजवादी धर्तीची समाजरचना निर्माण करण्याच्या दृष्टीने तर आपले पाऊल बहुधा एक इंचभरही पुढे पडले नाही असेच सर्वसाधारण जनतेत वाटत आहे.

## चवथी पंचवार्षिक योजना

चवथ्या योजनेची रूपरेखा १९६६ त तयार असताही अनेक कारणांमुळे ती ठरल्या वेळी सुरू होण्यात अडचणी उत्पन्न झाल्यामुळे तिची कार्यवाही लांबणीवर टाकण्यात आली. मात्र १९६६–६७ व १९६७–६८ या दोन वर्षांच्या काळात प्रत्येकी एक अशा दोन एकवर्षीय योजना तयार करून पार पाडण्यात आल्या. नंतर १९६९–७० साली चौथ्या योजनेला सुरवात करण्यात आली. ती ७३–७४ साली पूर्ण होणार आहे असे राज्यकर्ते सांगतात. म्हणून मानावयास हरकत नाही. तसे भासमानमात्र होत नाही. ते काहीही असले तरी ती योजना ज्या स्वरूपात जनतेपुढे ठेवण्यात आली त्याकडे थोडा दृष्टिक्षेप करण्यास हरकत नाही.

गुंतवणुकीच्या दृष्टीने ही योजना फारच महत्वाकांक्षी स्वरूपाची आहे. २१५०० कोटी रुपयांची म्हणजेच पहिल्या तीन योजनामधील संकलित अशा आकड्यातूनही हा आकडा मोठा आहे. योजनेची सामाजिक उद्दिष्टे पूर्वीचीच आहेत. ती म्हणजे विषमता कमी करणे, आर्थिक सत्ता विकेंद्रित करणे वगैरे. मात्र त्यात एक महत्वाची भर घालण्यात आली आहे. एकंदरीने राष्ट्रीय उत्पन्न वाढले म्हणजे सामान्य माणसाला आर्थिक सुबत्ता प्राप्त झाली असे नव्हे; सर्वसामान्य सुबत्ता वाढण्याबरोबरच दारिद्र्यही वाढू शकते म्हणून गरिबांना नोकऱ्यांची संधी, वाढते उत्पन्न व परिणामी रहाणीचा दर्जा सुधारण्याला वाव देणे, याचे महत्व योजनेत मान्य करण्यात आले आहे. मात्र हे काम फारच प्रचंड गुंतवणुकीचे असल्याने योजनाकारांनी दहा वर्षांत २०% लोकांना कमितकमी,

चालू बाजारभावाप्रमाणे दरमहा निदान २० रु. चे तरी उत्पन्न मिळावे इतकेच मर्यादित उद्दिष्ट समोर ठेवलेले दिसते. सध्याचे बाजारभाव लक्षात घेता व्यक्तीला किमान ३५।– रु. तरी दरमहा मिळाले पाहिजेत हे लक्षात घेता वरील उद्दिष्ट निराशाजनकच म्हणावे लागेल. परंतु याबद्दल योजनाकारांना दोष देणे युक्त होणार नाही. कामच फार अवाढव्य आहे यामुळे एकपंचमांश संख्येला तरी किमान दरडोई २० रु. महिना मिळाला पाहिजे असे प्रतिपादण्यात सुद्धा त्यांची प्रगतिशील ध्येयदृष्टि दिसून येते हे मान्य करायला हवे. समाजवादाच्या दृष्टीने हे पाऊल निश्चितपणे पुढचे आहे यात शंका नाही; अर्थातच तसे प्रत्यक्ष घडले तर !

पहिल्या तीन योजनात राष्ट्रीय उत्पन्न वर्षाला सरासरीने ५% वाढविण्याचे उद्दिष्ट होते. चवथीत ते ७% करण्यात आले आहे. यावरून योजनाकारांना प्रगतीची निकड तीव्रतेने भासत असल्याचेही दिसून येते. हे सर्व लक्षात घेऊनही ह्या योजनेच्या पूर्तीसाठी जरूर ती व तितकी साधने उपलब्ध होतील की नाही, तसेच उपलब्ध साधनांचा उपयोग वरील सामाजिक उद्दिष्टे साध्य करण्याच्या दिशेने निश्चितपणे होईल, की नाही हे कोणी सांगावे ? पहिल्या तीन योजनांची कार्यवाही व त्यांचे फलित लक्षात घेतले तर आशेला वाव थोडाच आहे इतकेच खरे; मग अनपेक्षितपणे काही घडले व परिस्थितीला अनकूल वळण मिळाले तर गोष्ट निराळी. अमेरिकेकडून मिळणारी भरघोस मदत आता बंद झाल्यासारखीच असल्याने स्वावलंबनाची कांस धरण्याचे महत्त्व आपल्या मनावर खरोखरी बिंबले व त्यानुसार या योजनेच्या राहिलेल्या भागाची पुनर्‌रचना करण्याची आपण कोशीस केली तर अमेरिकेचे हे धोरण इष्टापत्तीच ठरेल यांत शंका नाही. पण त्यासाठी काही काळ प्रगतीचा वेग मंदावल्यासारखा वाटला तरी हरकत नाही. पंधरावीस वर्षांच्या नियोजनानंतर अर्थव्यवस्थेला स्वावलंबनाचे वळण जवळजवळ पूर्णांशाने आजपावेतो मिळावयास हवे होते. इतरांनी मदत थांबविल्यानंतर आपद्धर्म म्हणून स्वावलंबनाची कांस धरण्याचा प्रसंग येण्यापेक्षा ते राष्ट्रीय प्रतिष्ठेला अधिक साजेसे झाले असते. निदान आता तरी त्या दिशेने आपले पाऊल पडत आहे ‘ हेही नसे थोडके ’. कोणत्याही कोंबड्याच्या आरवण्याने का होईना सूर्य उगवला ही महत्त्वाची गोष्ट होय. अपेक्षा इतकीच की क्षितिजावर दिसणारे हे सूर्यबिंब मावळतीचे नसून उगवतीचे आहे याचा प्रत्यय यापुढील धोरणातून वाढत्या प्रमाणात जनतेला मिळावा. राज्यकर्त्यांच्या कर्तृत्वाची कसोटी तीच होय.





'योजना' नावाच्या नियोजनमंडळाच्या नियतकालिकाच्या ९ जानेवारी ७२ च्या अंकात चवथ्या योजनेच्या १९७१ अखेरपर्यंतच्या दोन वर्षांच्या कार्यवाही संबंधीचे एक आधिकृत प्रतिवृत्त प्रसिद्ध झाले आहे. ते पहाता आपले राज्यकर्ते वरील कसोटीला उतरण्याची शक्यता फार थोडी आहे असे वाटते. या प्रतिवृत्ताचा सारांश असा –

१) अर्थव्यवस्थेच्या बहुतेक सर्व महत्वाच्या विभागात अनेक अडचणी उद्भवून प्रगति मंदावली आहे, व त्यामुळे योजनेचा राहिलेला काळ बिकट आहे. (या अडचणी भारत-पाक युद्ध, निर्वासितांची प्रचंड आवक, युद्धामुळे सीमावर्ती राज्यांची झालेली हानी, बांगला देशाला देण्यात यावयाची मदत इ. मुळे उत्पन्न झालेल्या नाहीत हे मुद्दाम लक्षात घ्यावयास हवे. कारण प्रतिवृत्तात या कारणांचा अतिरिक्त कारणे म्हणून स्वतंत्र उल्लेख केला आहे. ).

२) ही अवघड परिस्थिती उत्पन्न करणाऱ्या कारणांपैकी काही महत्त्वाच्या कारणांचा निर्देश पंतप्रधानांनी केला. ती कारणे म्हणजे पोलाद, खते, यंत्रविषयक हत्यारे, रेल्वेच्या वाघिणी, दगडी कोळसा इ. च्या उत्पादनाच्या साधनांचा अपूर्ण उपयोग. थोडीशीच अधिक गुंतवणूक केल्यास सध्या आपल्यापाशी असलेल्या यंत्रसामग्रीचा मोठ्या प्रमाणावर होऊ शकणाऱ्या विस्ताराकडे दुर्लक्ष वगैरे.

३) भाववाढ रोखण्यात शासनाला आलेले संपूर्ण अपयश; नव्हे शासनाने यासाठी आजपावेतो परिणामकारक उपायच योजले नाहीत.

४) मानवी शक्तीचा विकासकार्याकडे उपयोग करून घेऊन समाजातील खालच्या थरातील जनतेला अधिक चांगले दिवस आणून देण्याच्या ध्येयाची उपेक्षा.

आर्थिक प्रगतीलाच याप्रमाणे सुरुंग लागत असताना समाजवादी धर्तीच्या समाजरचनेकडे होणारी वाटचाल जवळजवळ बंदच पडली असावी हे सांगण्यास ज्योतिषांची जरूर नाही.

समाजवादी धर्तीची समाजरचना निर्माण करण्याचा उद्देश समोर ठेवून आखण्यात आलेल्या पंचवर्षीय योजनांच्या फलनिष्पत्तीचे याप्रमाणे विहंगमावलोकन केल्यानंतर आता गेल्या वीस वर्षातील योजनात्मक कार्यासंबंधी सुचणाऱ्या काही सर्वसामान्य विचारांकडे पुढील लेखात दृष्टिक्षेप करू.

❖ ❖ ❖

अनुक्रमणिका

श्री. रा. वि. ओतुरकर

# विकेन्द्रित राज्यकारभाराचा प्रयोग
# पंचायत समित्या व जिल्हा परिषदा

प्रस्तुत लेखाचा उद्देश पंचायत समित्यांच्या कारभारासंबंधी गेल्या पांच सहा वर्षात जे विचारमंथन व लेखन झाले त्याचा परिचय करून देण्याचा आहे. अशी विविध विचारमंथने एकत्र केल्याने त्या विषयाकडे सामग्र्याने पहाण्याची दृष्टि लाभते व दोषनिवारणार्थ उपाय सुचतात. आजचा सामान्य सुशिक्षित मनुष्य पंचायत कारभाराकडे दुर्लक्ष करतो. किंवा काहीशा तुच्छतेनेही पहातो. पंचायत समित्यांच्या कारभारकक्षेत येणारा सुशिक्षित 'पूर्वीचे दिवस बरे होते' अशा वृत्तीने दिवस काढतो किंवा आपापल्या मर्यादित कक्षेपुरती चळवळ, संप, घेराव इत्यादींचा अवलंब करतो. पंचायत समित्यांचा कारभार कसा चालला आहे, त्यांत इष्ट काय, अनिष्ट काय, अशा अभ्यासू वृत्तीने पहाण्याकडे बहुधा कोणाचे लक्ष नसते.

जिल्हा परिषदांसंबंधी ( यात पंचायत समित्या येतात ) ए. एच् हॅन्सन व जॅनेट डग्लस यांनी 'इंडियाज डेमॉक्रसी' हे जे पुस्तक लिहिले आहे त्यात विस्ताराने विवेचन केले आहे. यात १९७० अखेरपर्यंतचा विचार आहे. त्यांचे लेखन ऐतिहासिक व सिंहावलोकनात्मक आहे. त्यात जिल्हापरिषदांचा कारभार सुरू होण्यापूर्वी कोणकोणते प्रयोग झाले व त्यांचा जन्म कोणत्या प्रसंगाने झाला ते सांगितले आहे. दुसरे पुस्तक मेरी कॅरस यांचे 'ए स्टडी ऑफ् डिस्ट्रिक्ट कौन्सिलस इन महाराष्ट्र' या नावाचे आहे. यानी नमुन्यादाखल औरंगाबाद, रत्नागिरी, पुणे व अकोला येथील जिल्हापरिषदांच्या कारभाराची पाहणी करून, अनेकांच्या भेटी घेऊन, माहिती जमवून नंतर आपले निष्कर्ष सादर केले आहेत. त्यांचा आर्थिक घटनांवर भर आहे पुस्तक अतिशय अभ्यासपूर्ण असे आहे. हे पुस्तकही इ. स. १९७० पर्यंतच्या घटना लक्षात घेऊन लिहिलेले आहे.

अनुक्रमणिका






तिसरे लेखन एड्रियन मेयर यांचे इ. स. १९६७ साली प्रसिद्ध झाले. हे प्रस्तुत लेखकाने स्वतः पाहिले नाही. परंतु त्यांच्या विचाराचे भाषांतर 'समाज प्रबोधन' च्या फेब्रुवारी १९७२ च्या अंकांत प्रसिद्ध झाले आहे. या लेखाचे नांव 'जिल्हापातळीवर जातीयतेचा प्रभाव' असे आहे. मेयर यांनी देवास जिल्ह्याची पाहणी करून आपले विचार प्रगट केले आहेत. ही पाहणी स्थानिक, व खोलवर अशी झालेली असून लेखकास सामाजिक दृष्टि आहे व जिल्हा परिषदेच्या कारभारात जे तट पडतात त्यास जातीयता कशी कारणीभूत नाही, जातींना आता नवे स्वरूप कसे प्राप्त झाले आहे, कारभारात गट पडण्याची सामाजिक कारणे कोणती, याचे विवेचन आहे. मेरी कॅरसच्या पुस्तकातही जिल्ह्यात जातीमुळे गट पडत नाहीत, तर ते अर्थकारणावरून पडतात असे विवेचन आहे.

चौथे लेखन जिल्हापरिषदांच्या कारभाराची पहाणी करण्यासाठी महाराष्ट्रराज्याने श्री. बोंगिरवार यांचे अध्यक्षतेखाली जी एक समिती नेमली होती तिचा जो अहवाल १९७० साली प्रसिद्ध झाला व नंतर विधिमंडळात त्या समितीच्या शिफारसी मंजूरही झाल्या, तत्संबंधी आहे. हा मूळ अहवालही लेखकाने पाहिला नाही. पण 'महाराष्ट्रातील पंचायत राज्यांचे पुनर्मूल्यांकन' या शीर्षकाखाली समाजप्रबोधनच्या नोव्हेंबर १९७२ च्या अंकात श्री. गो. स. कामत व श्री. भास्कर भोळे यांचे दोन स्वतंत्र लेख प्रसिद्ध झाले आहेत त्यावर प्रस्तुत लेखन आधारलेले आहे. या अहवालाचे स्वरूप समालोचनात्मक व काही निष्कर्ष सुचविणारे असे आहे. सारांश पहिला ऐतिहासिक, दुसरा आर्थिक आणि तिसरा सामाजिक व साकल्याने आजच्या स्थितीवर विचार मांडणारा अशी विविध दृष्टिकोनातून झालेली ही लेखने आहेत. त्यांचा अनुक्रमाने परामर्ष घेऊन शेवटी साकल्याने विचार करता येईल.

'इंडियाज डेमॉक्रसी' या ग्रंथात हॅन्सन व डग्लस हे जिल्हापरिषदांकडे वळण्यापूर्वी भारतीय लोकशाही संबंधी काही प्रास्ताविक विचार जणू विषयाची पार्श्वभूमी म्हणून व्यक्त करतात ते म्हणतात 'भारतात आज २०।२२ वर्षे लोकशाही स्थिर आहे व निवडणुकाही सुरळीत पार पडतात पण याचे कारण त्यांच्या मते वेगळेच आहे: १) ग्रामीण बहुजन समाज राजकीय पक्षोपपक्षाबद्दल उदासीन असून तो अति श्रीमंती व अति गरीबीमध्ये विभागला गेला आहे. २) अतिगरीब आपल्या पोटापाण्याच्या उद्योगात गर्क असून बव्हंशी निरक्षर आहे यामुळे त्यांना इकडेतिकडे पहाण्यास फुरसदच नाही. ३) कारण भारतात

प्रदीर्घकाळात प्रभावी असलेल्या 'ठेविले अनंते तैसेची रहावे' याविचारावर आधारलेल्या तत्वज्ञानाच्या प्रभावामुळे जनतेची एकप्रकारची बेपर्वाईची वृत्ति. या तीन कारणांनी भारतातील लोकशाहीस स्थैर्य आले आहे. जातिबंध हे राजकारणात दृढ झाले असून ते राजकीय पक्षावर दबाव आणण्याचे काम (pressure groups) करू शकतात. पण जात ही वर्ग निर्माण करू शकत नाही, कारण प्रत्येक जातीत श्रीमंत व गरीब असतातच. जाति व वर्ग यांची सरमिसळ मात्र झालेली आहे. फक्त रेपब्लिकन पार्टी ही मात्र जातीय आहे, (यात लेखक मुस्लिम लीगचा का समावेश करीत नाहीत ते कळत नाही) काँग्रेस हा एकेकाळी नुसता राजकीय पक्ष नव्हता, तिच्या बुडाशी एक संवेद्य अशी भावना होती. पण ती स्थिति आता पालटली आहे. ती बरीच वर्षे अधिकारावर आहे पण तिच्यात गट उत्पन्न झाले आहेत. बऱ्याच चळवळीनंतर इ. स. १९५४ साली आवडी काँग्रेसचा 'समाजवादी नमुन्यावर भारतीय समाजाचे स्थित्यंतर करण्याचा (A socialist pattern of society) ठराव मान्य झाला. परंतु नंतरच्या काळात तो 'नाहीरे' वाल्यांना बदल होईल अशी आशा दाखविणारा व 'आहेरे' वाल्यांना स्थैर्याचे आश्वासन देणारा ठरला आहे! एकूण काँग्रेसचा ध्येयवाद संदिग्ध आहे. ही स्थिति अशीच राहिली तर देशात हुकूमशाही येईल. मात्र काँग्रेस अंतर्गत गटसमुदाय एकमेकांशी भांडत रहातील त्यांच्यात अजून वेळोवेळी समझोता (Concensus) होत असतो पण प्रा. मॉरिस जोन्सनी म्हटल्याप्रमाणे हा समझोता म्हणजे खरोखर 'बिघडत चाललेल्या वस्तुस्थितीवर[१] 'चढवलेली सफेती' असे त्याचे स्वरूप असते.[१]

नंतर पंचायत समित्याकडे वळून ते म्हणतात खरोखरच पंचायतराज्य हे जनजागृतीचे लोण खालपर्यंत पोचविणारे व भारतीय घटनेशी आणि राज्य-कारभाराशी सामान्य माणसास एकरूप करून देऊन त्यांच्यात नव्या राजकीय जाणिवा उत्पन्न करून देणारे, अशी यंत्रणा आहे. परंतु भारतीय घटनेत याचे महत्त्व पुरेसे लक्षात घेतलेले दिसत नाही. फक्त घटनेच्या ४० व्या 'निर्देशक (Directive) कलमात 'प्रत्येक राज्याने ग्रामपंचायती संघटित कराव्यात व राज्यसरकाराने त्याना स्वराज्याचे घटक म्हणून कारभार करण्यासाठी पुरेसे अधिकार द्यावे' असे म्हटले आहे. निर्देशक कलमे ही शिफारसवजा असतात हे सांगावयास नकोच.

---

१. (Concensus in a fair name for what may be an ugly reality).

घटनेचा अम्मल सुरू झाल्यावर पहिली काही वर्षे नुसता ग्रामपंचायतींचा प्रसार करण्यात गेली. राज्यकर्त्यांच्या मनांत प्राचीन ग्रामपंचायतींच्या स्वायत्तते-बद्दल भलतीच अतिशयोक्त कल्पना होती. पण पुढे विकासासाठी नियोजनाचे धोरण सुरु करण्याचे ठरल्यावर ग्रामपंचायतींचा कारभार पहाता त्यांना लोकांच्या अगदी मूलभूत गरजाही भागवता आल्या नाहीत अर्थात त्यांना आहे त्या स्थितीत विकासाच्या कामी माध्यम म्हणून वापरणे अशक्य आहे असे आढळून आले. तेव्हा कम्युनिटीडेव्हलपमेंट प्रॉजेक्टचा प्रयोग हाती घेतला गेला. प्रत्येक ग्राम-समुदायास ब्लॉक म्हणावयाचे. त्यांचा विकास करण्यासाठी एक प्रशिक्षित प्रमुख 'ब्लॉक डेव्हलपमेंट ऑफिसर (B. D. O.) नेमावयाचा. त्याच्या हाताखाली दर चार पांच खेड्यावर एक शिक्षित 'ग्रामीण पातळीवरील कार्यकर्ता' ( Village Level Officer ) द्यावयाचा. या सर्व शिक्षित व प्रशिक्षिताच्या शिक्षणासाठी अभ्यासक्रम तयार करावयाचा व तो शिकून हे प्रशिक्षित तयार होऊन नेमले जावयाचे. या एकूण कार्यक्रमाचे तीन खंड करावे. पहिल्या कालखंडात ब्लॉकची पहाणी, माहिती गोळा करणे, व विकास कार्यक्रम आखणे; दुसऱ्या कालखंडात सर्वांनी हा कार्यक्रम अंमलात आणू लागणे, आणि तिसऱ्या कालखंडात प्रशिक्षितांना तेथून हलके हलके काढून घेऊन स्थानिक पुढाऱ्यांच्या हाती तो कार्यक्रम द्यावयाचा. अशा रीतीने ही संघटना पुढे आपोआप काम करू लागेल अशी या कम्युनिटी डे. प्रॉ. वाल्यांची आशा होती. पण ही आशा संपूर्ण अयशस्वी ठरली ! याची कारणे अशी : ( १ ) प्राथमिक पाहणीत व नंतर नियोजित कार्यक्रमाबद्दल अवास्तव अपेक्षा, २) नियुक्त B. D. O. हे सनदीनोकराप्रमाणे काम करीत, त्यांना समाजसेवेचे बाळकडू नव्हते. या सनदी नोकरांस फक्त वरच्या हुकुमांची तामिली करण्याची सवय होती. त्यात जन्म गेलेले हे लोक. ३) स्थानिक नेतृत्व आपले वर्ण व जातविषयक पूर्वग्रह सोडून सर्व प्रकारच्या ग्रामीण सेवेस वाहून घेईल ही कल्पनाच खोटी ठरल्यामुळे या कार्यक्रमाच्या यशास हवे असलेले स्थानिक पुढारीच पुढे आले नाहीत.

हे अपयश लक्षात घेऊन वास्तविक हा कम्युनिटी डेव्हलपमेंट कार्यक्रम रद्द करावा. पण तसे न करता योजना, समितीने याबाबत सल्ला देण्यासाठी बलवंतराय मेहेता यांच्या नेतृत्वाखाली एक समिती नेमली. या समितीने पुन: ग्रामीण स्वायत्त संस्थांचेच पुनरुज्जीवन करावे असे सुचविले व त्यासाठी पंचायत समित्या स्थापून, त्यांना स्वायत्त करून, त्यांना त्यांच्या प्राथमिक गरजास अवश्य अशी कामे द्यावी व त्यासाठी लागणारा पैसा वसूल कर-

ण्याचा अधिकार व सरकारी मदतही देणगी रूपाने द्यावी, असे सुचविले. इतके झाले म्हणजे पुढे सर्व काही आपोआप होईल ही बलवंतराय समितीची अपेक्षा. बलवंतराय–समितीने पंचायत समित्यांची जिल्हा पातळीवर जरूर तेथे जिल्हा परिषदही निर्माण करावी असे सुचविले. व त्या जि. प. ची घटनाही स्थूलपणे आखून दिली. बलवंतराय समिती ही अखिल भारतीय होती. तिच्या शिफारशी तेव्हा नूतन प्रस्थापित महाराष्ट्र राज्याने कशा अमलात आणाव्या हे ठरविण्यासाठी श्री. वसंतराव नाईक ( तेव्हाचे वसूलमंत्री, विद्यमान प्रमुख मंत्री ) ह्यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमली, तिने केलेल्या शिफारसीवरून महाराष्ट्र राज्यात इ. स. १९६२ साली एक कायदा होऊन पंचायत समित्या व जिल्हापरिषदा यांची निर्मिती व त्यांचा कारभार सुरू झाला.

पंचायत समित्यांचा मूळ उद्देश काही असो, त्यांच्या स्थापनेमुळे त्या आता भारतीय लोकशाहीशी एकरूप घटक बनल्या आहेत. इ. स. १९६२–६३ पूर्वी त्या काहींशा अधांतरीच होत्या. हेच दुसऱ्या भाषेत सांगावयाचे तर या समित्यांनी खेड्यांची सुधारणा कितपत झाली याचा विचार अंमळ बाजूस ठेवला तर त्या आता पक्क्या राजकीय घटक बनल्या आहेत. त्यांच्या हातात कांही नोकऱ्या देण्याचे सामर्थ्य आल्यामुळे त्याना समाजात एक प्रतिष्ठा लाभली आहे. पण या समित्यांची निर्मिती झाली तेव्हा डॉ. आंबेडकर त्यांच्या स्थापने-विरुद्ध होते. ते म्हणाले ‘अज्ञान, संकुचित भावना व गावगुंडी यानी भारलेले हे लोक व त्यांच्या संस्था राष्ट्रोद्धाराचे साधन म्हणून कशा उपयोगी पडणार ?’ गोरवालाही म्हणाले ‘अहो, ग्रामपंचायतींना जेथे लोकांच्या मूलभूत गरजा भागवता आल्या नाहीत, तेथे त्यांच्या समित्या त्याना पैसा दिला तरी राष्ट्रो-द्धारास कशा समर्थ होणार ? ’ अशा टीकांकडे सरकारने लक्ष दिले नाही तरी, महाराष्ट्रराज्यात नाईक समितीने जिल्हा परिषदा निर्माण करून त्याना सर्व समित्यांची नियामक समिती बनविण्यात पुणे जिल्ह्याच्या उत्तरेकडील जुन्नरचे प्रतिनिधी, आग्नेयेकडील इंदापूरची किंवा इंदापूरचे जुन्नरची गरज भागविण्या-साठी त्याग करण्याइतके उदारबुद्धीचे होतील का अशासारख्या अनेक प्रश्नाकडे त्यांनी दुर्लक्षच केले असे म्हणावे लागते.

जिल्हापरिषद व पंचायतसमित्या या कोणत्या स्थितीत अस्तित्वात आल्या याचे ऐतिहासिक समालोचन केल्यावर या समित्यांच्या कार्यपद्धतीसंबंधी उपरोक्त लेखकद्वयांनी आपले विचार प्रगट केले आहेत, ते म्हणतात :

या समित्यांचे उत्पन्न गरजांच्या मानाने फार तोकडे ( दर माणशी रु. २ ) असल्यामुळे त्या समाज संवर्धन कार्यावर अधिक खर्च करू शकत नाहीत. त्यांचे कार्य सरकारने नेमलेल्या अधिकाऱ्यावर अवलंबून असल्यामुळे त्यांच्या कार्यात स्वायत्तपणाचे तेज नाही. ग्रामीण समित्यांचा शहराशी देवाण-घेवाणीचा संबंध नसल्यामुळे तेथील सुधारित कार्यपद्धति त्यांना विशेष परिचित नाही पण त्या बरोबरच त्यांचे 'शहरी नागरिकां'पासून काहीसे रक्षणही झाले आहे. ग्रामीण भागात आता जुने पारंपरिक जमीनदार व श्रेष्ठी यांचा वरचष्मा राहिला नाही. आता त्यांच्या जागी नवे ग्रामीण पुढारी, पैसेवाले, राजकीय पक्षाचे सभासद विधिमंडळात शिरण्याची आकांक्षा धरणारे असे लोक पुढे येत आहेत. स्थानिक समित्या राजकारणात भाग घेऊ लागल्या आहेत व तेथील कारभार राजकीय पक्षांचे आखाडे बनले आहेत त्यामुळे स्थानिक महत्त्वाच्या दृष्टीने त्यांचा आपसात समझोता होत नाही. याच संदर्भात मेरी कॅरस म्हणतात, जिल्हा परिषदांमुळे जिल्हा काँग्रेस कमिटयांचे महत्व कमी झाले आहे; कारण जि. प. च्या हातात नोकऱ्या, बदल्या, ग्रँटस वगैरे असल्यामुळे मतदार त्यांच्या हातात आहेत. शिवाय जिल्हा परिषदा राज्य पातळीतील राजकारणावरही दबाव आणू शकतात.

पंचायत समितीचा ग्रामीण कार्यकर्ता व त्याच्यावरचा बी. डी. ओ. यांना किती तंत्रे सांभाळावी लागतात याचे वर्णन करताना ते म्हणतात, एकीकडे पं. स. ग्रा. कार्यकर्ता पंचायत समितीच्या कारभाराबाबत ग्रामपंचायतींना मार्गदर्शन करणारा, तो बी. डी. ओ. स जबाबदार, पंचायत समितीचा सेक्रेटरी पंचायत समितीचे ठराव अंमलात आणणार, त्यांचेही तंत्र पं. स. ग्रा. कार्यकर्ता, याने सांभाळावे अशी विविध तंत्रे सांभाळण्याइतका तो प्रौढ समजूतदार व शिक्षित नसतो. अशा स्थितीत तो आला दिवस कसाबसा रेटीत रहातो. बी. डी. ओ. ने पं. स. च्या कार्यकर्त्यांचे अहवाल एकत्र करायचे, त्याजकडे आलेल्या सर्व निधींची व्यवस्था पहावयाची, ब्लॉकच्या कक्षेतील, शेती, शिक्षण, वैद्यक अशा विविध खात्यांच्या कामांची जुळणी करायची. त्या खात्यांचे त्या विभागांतील प्रमुख पुनः आपापल्या खात्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यास जबाबदार असणार ! बी. डी. ओ. ने आपल्या वरिष्ठाची म्हणजे कलेक्टर किंवा तत्सम अधिकाऱ्यांची मर्जी सांभाळायची व त्यांच्या सूचनांची अंमलबजावणी करावयाची. कलेक्टर किंवा तत्सम अधिकारी सर्व जिल्ह्यांतून येणाऱ्या लोकांच्या तक्रारी समजून घेऊन त्यांची नोंद करणार व ते लोण बी. डी. ओ. कडे पोहोचविणार. बी. डी. ओ. ची

बहुधा आय्. ए. एस्. मधून निवड होते. त्याला या जागेवर काम करून पुढे ॲसिस्टंट किंवा डेप्युटी कलेक्टर होण्याचा संभव कमीच असतो, म्हणून तो जणू काय धरून पकडून आणलेला व बी. डी. ओ. 'बनविलेला' असतो. तो आपली बदली व्हायची वाट पहात असतो व आपले बी. डी. ओ. चे स्थान कसेबसे सांभाळतो. या सर्वांवरून असे दिसते की लोकप्रतिनिधि व अधिकारी यांचे संबंध सलोख्याचे रहात नाहीत. ते तणातणीचे असतात. त्यात बिचाऱ्या बी. डी. ओ. ची स्थिती फार दयनीय होते.

पंचायतींच्या माध्यमातून समाज विकास (कम्युनिटी डेव्हलपमेंट प्रॉजेक्ट) घडवून आणावयाचा, ही मूळ योजनाकर्त्यांची अपेक्षा फोल ठरली आहे. कारण लोक जात विसरले नाहीत. पूर्वी ग्रामीण भागात वजनदार असलेल्या जाती आता जागृत होऊन सर्व सवलतींचा फायदा आपणाकडे ओढून घेत आहेत. खालच्या पातळीवरील वर्गही आता जागा झाला आहे; तो अजून वरिष्ठांस मते देतो पण कुठे देऊळ, तर कुठे शाळा तर कुठे पाण्याचा हौद अशा सवलतींची किंमत मागून घेऊन आपली मते त्यांना देतो ही सगळी आश्वासने कितपत फलद्रूप होतात याची कल्पनाच करणे बरे! जातींना आता सत्ताधारी व सत्ताहीन अशा वर्गाचे स्वरूप– एक नवाच 'सामाजिक आशयाचा आकृतिबंध' असे स्वरूप आलेले आहे. ग्रामीण पातळीवरील सभा बहुधा कोरमच्या अभावी भरत नाहीत. भरल्यातर त्या मरगळीत चालतात. विचार करायचे व काही ठरावयाचे काम बहुधा सत्ताधारी वर्गाकडे जाते. सत्ताहीन निमूटपणे ऐकून घेतात. पिढ्यान् पिढ्या हे विचार–विचार करण्याचे काम आपले नाहीच अशी त्यांची समजूत झालेली आहे. विचार करणारे हितसंबंधी असतात. ज्याला त्याला आपले घोडे पुढे दामटायचे असते. अशा स्थितीत ते वर्दळीवर येतात. त्यातूनही काही 'समझोत्याने' ठरलेच तर असंतुष्ट लोक उपास, बहिष्कार, दंगा अशा मार्गांनी आपला असंतोष व्यक्त करतात.

नियोजन समितीने नियोजनाचे लोण ग्रामीण पातळीकडून तयार होऊन यावे असे ठरविले म्हणजे ग्रामीण व पंचायत पातळीवर योजनाच योजना तयार होतात. खर्चाची मागणी बेफाट होते. जिल्हापरिषद त्या सर्वच योजना अंमळ छाटून वरिष्ठस्तरावर पाठवितात. अशा स्थितीत ज्यांचे वरच्या स्तरापर्यंत हात पोहोचू शकतात त्यांचे फावते. यापेक्षा नियोजन समिती तरी काय करणार?

या सर्व गोष्टींचा इत्यर्थ असा की पंचायत समिती संबंधी केलेल्या अपेक्षा फार उंचावलेल्या होत्या. त्यांच्या आवाक्याबाहेरची कामे त्यांच्याकडून अपेक्षिली गेली. यापेक्षा अपेक्षा मर्यादित राखून त्यांचेकडून तेवढेच काम करून घेतले

असते. आरोग्य, पाणीपुरवठा, शेतीस साह्य इ. अशासारखी उपयुक्त पण साधी कामे तर पंचायतीना आपले काम अधिक यशस्वी करून दाखविता आले असते.

हे सर्व खरे असले तरी यातूनच सुधारणेची वाट काढली पाहिजे. आता टाकलेले पाऊल मागे घेता येत नाही. कारण प्रारंभीं सांगितल्याप्रमाणे भारतीय राज्यकारभार यंत्रणेत जि. प. ना व पंचायत समित्यांना आता पक्के स्थान प्राप्त झाले आहे; इतकेच नव्हे तर जिल्हा परिषदा या भारतीय समाजाच्या एक आधुनिक सामुदायिक घटक बनल्या आहेत. त्या समाजाशीही एकजीव झालेल्या आहेत. इ. स. १९७१ च्या निवडणुकीतील 'इंदिराविजय' हा इतर क्षेत्रात परिणामकारक होवो वा न होवो. तो एक निवडणुकीचे गट, जाती, निवडणुकांचे पुढारी यांच्या तावडीतून बाहेर निघालेला 'व्यक्तिविजय' आहे. यातून हुकूमशाही येईल की आणखी काय होईल हे भविष्य काळच ठरवील !

मेरी कॅरस यांचे म्हणणे असे की भारताने संमिश्र अर्थव्यवस्थेचा पुरस्कार केला आहे. संमिश्र म्हटले की त्यांत व उजवे डावे अशा दोन्ही धोरणाचा पुरस्कार करणारे लोक असणारच. हे उजवे डावेपण भारतात लहानमोठ्या सर्व पातळी-वरील राजकीय संस्थांना व्यापून राहिले आहे. अर्थात ते पंचायत राज्यातूनही आपले एकमेकाविरुद्ध डावपेच मोठ्या कौशल्याने खेळत असतात. आणि या क्षेत्रात तरी सामान्यतः उजवे हे डाव्यांच्या सामान्य लोकहिताच्या योजना उधळून टाकतात किंवा त्यावर दबाव आणू शकतात. मुंबईत बडेबडे उद्योगपती आहेत त्यांच्या हाती प्रसिद्धीची साधने असतात. मंत्र्यांना कधी समारंभाचे अध्यक्ष करून, तर कधी रात्रौ खान्यास बोलावून, तर कधी सवलतीने माल पुरवून, तर कधी मंत्र्याचा नातलग नोकरीस लावून घेऊन, तर कधी निवडणुकीस पैसा पुरवून ते मंत्र्यांची सहज सहानुभूती संपादन करून घेऊ शकतात. या उद्योगपतींच्या धंद्यांच्या राज्यभर अनेक ठिकाणी शाखा असतात. या शाखांचे एजंट जिल्ह्यात सर्वत्र हिंडून कच्चा माल किंवा धान्य जमा करणे व आपला तयार माल खपविणे हे उद्योग करीत असतात. अशावेळी एखाद्या जिल्हा परिषदेने सहकारी तत्वावर एखादा कारखाना उभारून त्या योगें खाजगी उद्योगपतींना मिळणाऱ्या नफ्याच्या अंशाला धोका पोहोचेल असे वाटले, तर एकीकडे सहकारी तत्वांची तोंडाने स्तुती करीत, राज्यसरकारे जिल्हापरिषदांच्या उद्योगास खीळ घालण्यात यशस्वी होते. कारण मंत्र्यांची उद्योगपतींशी मुंबईत जवळीक असते. एका जिल्ह्यात प्रत्यक्ष घडलेले उदाहरण लेखिकेने दिले आहे. हिरड्याच्या फुला-पासून पक्का रंग तयार होतो. ही फुले रानावनांतून रहाणारे भिल्ल गोळा

करतात व ती मध्यस्थ दलाल त्यांच्यापासून फारच कमी किंमतीस विकत घेतात. व पुढे ती चौपट पाचपट नफा मिळवून रंगाऱ्यास किंवा त्यांच्या एजंटास मोठ्या प्रमाणावर विकतात. भिल्ल बिचारा कफल्लक रहातो ! या संबंधांत एका बी. डी. ओ. ने दलालांची मध्यस्थी दूर करण्यासाठी भिल्लांची सहकारी सोसायटी काढून तिने ती फुले रंगाऱ्यास विकावी यासाठी सहकारी संस्था काढण्याचे जि. प. स सुचविले. जिल्हा परिषदेत जेव्हा यावर चर्चा झाली तेव्हा तेथे उजवे विरुद्ध डावे असा वाद झाला. जिल्हा-परिषदेत बहुधा उजवे वजनदार आणि आपल्या वजनाने बहुसंख्येने निवडून येतात. तेथे उजव्यांनी डाव्यांचा पुरस्कार हाणून पाडला. सहकार पूज्य, पण सहकारी कृतीस विरोध असा प्रकार सर्वत्र आहे ! तालुक्यात किंवा पंचायत समितीत डावे बहुमताने निवडून येतात पण जिल्हापरिषदेत उजवे प्रबळ असतात. तालुका संघटनेत उजवे डाव्याना मोहक वचने देऊन भुलवितात. व डावे प्रखर टीका करतात पण अखेर कृति करण्यास धजावत नाहीत. पुणे, रत्नागिरी व औरंगाबाद हे तीन जिल्हे उजव्या वृत्तीचे आहेत. अकोला मात्र यास अपवाद आढळला. कारण तेथे साक्षरतेचे प्रमाण अधिक आहे. या सर्व भांडणातून जातीपेक्षा हितसंबंधांचे प्राबल्य अधिक असते. कदाचित एखाद्या जातीत एखादा हितसंबंध प्रबळ असेल एवढे मात्र खरे. डावे लढाऊ पवित्रा घेत नाहीत याचे कारण ते गरीब असतात. त्यांची शेते लहान, त्यांच्या हाती नगदी पिके काढण्याजोगे मोठे क्षेत्र नाही. याच्या उलट उजवे हे मोठमोठ्या शेतांचे मालक व नगदी पिके काढणारे असतात. एकूण डावे हे व्यक्तिशः जळफळले तरी त्यांचे प्रभावक्षेत्रच तोकडे असते.

याबाबत ठिकठिकाणी व्यवहार करणाऱ्या बँकांचे धोरणही डाव्यांच्या आड येते. बँका या कर्ज वाटपाचा व्यवहार करतात. पण अशा कर्जवाटपातून जे ग्रामीण व्यापार–व्यवहार होतात त्यांचे नियंत्रण त्या बँका करीत नाहीत. त्यामुळे ग्रामीण क्षेत्रात जे व्यवहार चालतात त्यावर त्यांचा प्रभाव पडत नाही. शिवाय डाव्यापेक्षा उजवे हे पतीला बळकट असल्याने, कर्जवाटपाचा बराच हिस्सा आपणाकडे आकर्षून घेऊ शकतात. पुनः या उजव्यांची निवासक्षेत्रे नजीकची शहरेच असतात. व तेथूनच त्याचे सर्व व्यवहार चालतात. उद्या बँकांनी ग्रामीण क्षेत्रातील व्यापार– व्यवहाराच्या तपशीलात जाऊन त्यांचे नियंत्रण करावयाचे ठरविले तर अखेर त्यांच्यात व राज्यसरकारच्या धोरणात तणातणी निर्माण होईल. अशावेळी बँकांनी गरीबास उपकारक असा अर्थ-व्यवहारात भाग घेतला तर कदाचित राज्यसरकार या जिल्हा परिषदाच

काढून टाकाव्यात किंवा त्यावर सरकारचे आहे त्याहून अधिक नियंत्रण घालावे असा यत्न करील व जि. प. चे आज आहे तेवढेही स्वायत्तपण आणखी संकुचित होईल.

श्री. एड्रियन मेयर हे देवास जिल्ह्याच्या पहाणीनंतर आपले विचार प्रकट करताना म्हणतात, पंचायत समित्यांच्याद्वारे झालेल्या विकेन्द्रीकरणातून जनतेची कारभारावर पकड बसण्याऐवजी वरचढ हितसंबंधी गट आपल्या डावपेचांनी आपली पकड स्थानिक कारभारावर अधिक घट्ट बसवू शकले आहेत. हे वरचढ गट राजकीय पक्षाचा आश्रय घेतात. व अधिक बळकट होतात. जिल्हा राजकारण हे गटबाजीचे राजकारण झाले आहे. कधी कधी गटाचे मत राजकीय पक्षाच्या धोरणास छेदून जाते. अशावेळी वरवर राजकीय पक्षाशी इमानदारी राखल्याचा देखावा करीत गटवाले आपल्या हितसंबंधाच्या बाजूस आपले गुप्त मतदान करतात तर कधी 'आयाराम गयाराम' पद्धतीचा अवलंब करून आपला राजकीय पक्ष तात्पुरता सोडून जातात, अशा मतदानात अखेर 'पैशाचे वाटप' हा एक परिणामकारक घटक असतोच !

ग्रामपंचायतीच्या निवडणुकात जात हा परिणामकारक घटक नसतो. गावात दुफळी असते. तिचे दोन प्रकार संभवतात. एक प्रतिष्ठित उमेदवार व त्याचाच नातलग प्रतिस्पर्धी यांच्यामधील. दुसरा; प्रतिष्ठित उमेदवार विरुद्ध मागासलेला सुशिक्षित. पहिल्या प्रकारात होणारी दुफळी सर्व जातीस छेदून जाते व सर्व जातीचे लोक या व त्या पक्षांत असतात. दुसऱ्या प्रकारात कधीकधी एखादा जातीचा गटचा गटच या किंवा त्या पक्षास जातो पण प्रतिष्ठितात प्रच्छन्न विरोधी सर्वत्र असतातच. जातीयता, राजकीय सत्ता, सामाजिक प्रतिष्ठा व आर्थिक ताकद या आता वेगवेगळे घटक बनत आहेत. ते सर्व एकाच जातीभोवती केन्द्रीभूत होत नाहीत पारंपरिक समाजव्यवस्थेत जात ही धर्म व कर्मकांडावर अधिष्ठित असते. आता जात या शब्दाचा अर्थ बदलत चालला असून तो एक राजकीय उद्दिष्टासाठी संघटित होणारा गट बनलेला आहे. विशिष्ट प्रकारच्या वर्तनास जात कारणीभूत नसून ती बहुधा एक निमित्त असते. ग्रामीण निवडणुकाही पुढे विधानसभेत व लोकसभेत होणाऱ्या निवडणुकांची दृष्टि ठेवून होत असतात. अशावेळी एखाद्या ठिकाणी प्रतिष्ठित गट हरिजन उमेदवारास पाठिंबा देऊन त्यास निवडून आणतात व आपण उदारमतवादी आहोत असा देखावा करू शकतात ! सारांश जात ही ग्रामीण गटबाजीचे प्रमुख कारण होत नाही.

बोंगिरवार-समितीच्या अहवालावर आधारलेले श्री. कामत व श्री. भोळे यांचे लेख मुख्यतः समितीच्या शिफारसीचा सारांश सांगणारे व क्वचित टीका करणारे आहेत. समितीचा अहवाल हॅन्सन डग्लस यांनी केलेल्या लेखनाप्रमाणे ऐतिहासिक सिंहावलोकनावर अधिष्ठित नाही. त्यामुळे जिल्हा परिषदांतील दोष मुळात कोठे उत्पन्न झाले याचे त्यांत विवेचन दृष्टीस पडत नाही. पण आहे त्या परिस्थितीत जि. प. कारभारातील दोष काढून टाकण्यासाठी केलेल्या शिफारसी त्यांत आहेत. व तो जि. प. कारभारातील गैरव्यवस्थेची दुर्दैवी कथा सांगणारा आहे. समितीने सिंहावलोकन केले असते तर जि. प. वर एवढी मोठी जबाबदारी टाकू नये; त्यांना झेपतील एवढीच कामे प्रथम त्यांना देऊन नंतर क्रमाक्रमाने त्यांचे कार्यक्षेत्र वाढवीत जावे अशी मूलभूत शिफारस करण्याचे त्यांस सुचले असते. असो. श्री. कामत यांनी सांगितलेल्या समितीच्या शिफारसी अशा की 'सहकार' हे खाते जि. प. च्या कक्षेतून काढून ते राज्य सरकारने आपणाकडे घ्यावे व शेतीसुधारणा हा विषय त्यांजकडे सोपवावा. पंचायतसमिती ही पुष्कळांस अनावश्यक वाटते पण तशी वस्तुस्थिती नाही. तिला अंतर्गत स्वातंत्र्य नाही हे तिचे खरे दुखणे आहे. तिला अधिक अंतर्गत स्वातंत्र्य द्यावे पण ती जि प. शी किंवा वरील स्तरावरील काम करणाऱ्या घटकांशी निगडित मात्र असावी. तिसरी शिफारस अशी की जि. प. कक्षेतील दहा हजार लोकवस्तीच्या ग्रामपंचायतींचे नगरपालिकेत रूपांतर करावे म्हणजे त्या जि. प. च्या कक्षेबाहेर काम करू लागतील. चौथी शिफारस अशी की अस्पृश्यता निवारणाच्या आड येणारे पंच व सरपंच दूर करण्यासाठी राज्य सरकारने कठोरपणे वागले पाहिजे. स्वतंत्र न्यायपंचायती निर्माण करू नयेत. नव्या पंचायती निर्माण करण्यापूर्वी असलेल्या अगोदर बळकट कराव्यात. बोंगिरवार समिती म्हणते की एकूण जि. प. चा कारभार पाहाता या योजनेमुळे काही ठराविक जातीतच जागृती झाल्याचे आढळून येते.

श्री. भोळे यांनीही अहवालाच्या आधारे आपले विचार प्रकट केले आहेत त्यांचे म्हणणे असे की जि. प. किंवा पंचायत समिति यांच्या कक्षेतील विधिमंडळाचे सभासद यांनी जि. प. किंवा पंचायत समितीच्या कारभारावर दबाब आणू नये हे खरे असले तरी प्रत्यक्षात उलटच घडते, मग ते जि. प. त नियुक्त असोत वा नसोत. पंचायतनिधिमधील अफरातफरीचा आकडा १९६७ साली २३ लाख होता तो १९७० साली ६४ लाखावर गेला आहे ! जि. प. च्या अध्यक्षानी किंवा इतर सभासदांनी शासननियंत्रणेत हात

घालू नये हे खरे, पण प्रत्यक्षात हात घातला जातो. वाटेल तशा बदल्या होतात व 'आपला माणूस' हवा तेथे नियुक्त होतो. निर्वाचित सभासद प्रशासकास आपले नोकर समजतात व प्रशासकांस निर्वाचिताबद्दल आदर नसतो अशी स्थिती आहे. नियोजनाबद्दल सांगताना ते म्हणतात, खरोखर नियोजनाची यंत्रणाच नाही. प्रत्यक्ष होते ते नुसते वाटप. त्या वाटपाला शास्त्रीय निकष नाही. नियोजनाच्या वाटपात पंक्तिप्रपंच होतो तो वैय्यक्तिक हितसंबंधामुळे. हे थांबले पाहिजे. नियोजनाची उभारणी खालून वर अशी व्हावी पण तसे होत नाही. विद्यमान योजनांचे पर्यवेक्षण करणारी वरच्या पातळीवरील योजनाही वरवरची व उदासीन आहे. हिशेब तपासणीस ऑडिटर आहे पण कित्येक जि. प. आपले हिशेबच सादर करीत नाहीत. ऑडिटरने नामंजूर केलेला खर्च जि. प. कडून वसूल होत नाही. अशी थकबाकी तीन कोटी रुपये आहे! समितीने अमूक अमूक व्हायला हवे असे विध्यर्थी सांगून प्रस्तुत जि. प. रचनेत हे घडून येण्याची शक्यता आहे असा आशावाद प्रकट केला आहे! या भोळ्या आशावादास काय म्हणावे? एकूण श्री. भोळे म्हणतात, समितीच्या शिफारसी थातुरमातुर, पुस्तकी, हितचिंतनपर व अपुऱ्या आहेत. कारण प्रत्यक्ष परिस्थिती भेसूर आहे व मात्र ती या अहवालात प्रथमच एकत्रित झालेली आहे.

वरील त्रोटक विवेचनावरून बोंगिरवार समितीच्या शिफारशींचे स्वरूप कळून येण्यासारखे आहे. बोंगिरवार समितीने अफरातफरीचा आकडा ६ वर्षात २३ लाखावरून ६४ लाखापर्यंत गेला आहे व ऑडिटरने नामंजूर करूनही वसूल न झालेल्या रकमेचा एकूण आकडा तीन कोटी रुपये आहे. एकंदर परिस्थिति भेसूर आहे असे सांगूनही जि. प. चा कारभार थोड्या फेरफारानिशी पुढे चालू ठेवावा असा आशावाद प्रगट केला हे आश्चर्य आहे. त्याऐवजी जि. प. ना. न झेपेल एवढी कामगिरी त्यांचेवर सोपविल्यामुळे हा प्रयोग फसला आहे. अंबेडकर गोरवाला प्रभृतींचे भविष्य खरे झाले आहे असे स्वच्छ सांगण्याचे धैर्य दाखवू नये हे आश्चर्य नव्हे काय? बोंगिरवार समितीने सहकार हा विषय जि. प. च्या कक्षेतून काढून त्याजकडे शेतीसुधारणा हा विषय द्यावा असे सुचविले आहे. ही शिफारस अपक्व विचाराची द्योतक आहे. मेरी कॅरस यांच्या म्हणण्याप्रमाणे जि. प. त व पंचायतसमित्यात उजवे डावे हे प्रतिपक्षी असतात. उजवे हे पैकेवाल्यांचे साहाय्यक व डावे हे सामान्य जनतेसाठी सहकारी सोसायट्या काढून त्यांना तोंड देऊ पहाणारे असे असतात. सहकार हा विषय जि. प. च्या कक्षेतून काढून घेतला म्हणजे पैकेवाल्या उजव्या पक्षास रान मोकळे सापडणार. मग मुंबईचे धंदेवाले आपल्या जिल्ह्यातील एजंटामार्फत व स्थानिक मध्यस्थामार्फत जनतेस

पिळून काढणार आणि डाव्यास सहकारी सोसायटी काढून त्यांच्याशी तोंड देण्यास वाव रहाणार नाही. पुनः शेतीसुधारणा हा विषय जि. प. च्या हाती आला म्हणजे शेतीसुधारणेच्या नावाखाली परदेशातील शेती व इरिगेशनसाठी लागणारी व वारंवार नादुरुस्त होणारी यंत्रे मुंबईतील भांडवलवाल्यामार्फत जिल्ह्याजिल्ह्यात येऊन पोहोचणार व हजारो शेतकरी बेकार होणार ! यापेक्षा बँकांनी कर्ज देताना ग्रामीण व्यवहारावर लक्ष ठेवावे अशी साधी शिफारस समितीने का केली नाही ? दहा हजार लोकवस्तीच्या गावास म्युनिसिपालटी द्यावी ही समितीची शिफारस बरोबर आहे. त्यामुळे जि. प. चे कारभाराचे क्षेत्र मर्यादित होईल. तसेच आजच्या जि. प. च्या प्रशासक अधिकाऱ्यास अधिक सत्ता देऊन जि. प. च्या सभासदांना खालच्या पातळीवरील प्रशासकांच्या कार-भारात हात घालण्यास पायबंद घालावा असे का सुचविले नाही ? राज्यसरकारने अस्पृश्यता निवारणाबाबत नियमांचे उल्लंघन करणाऱ्या सभासदास, त्यांनी घट-नेच्या मूलभूत हक्काची पायमल्ली केली म्हणून यापुढे सभासद म्हणून रहाण्यास प्रतिबंध करावा असे का सुचविले नाही ? नियोजनाची यंत्रणा उभी करण्याची ताकद जि. प. जवळ नाही असे आढळून आल्यावर, नियोजन व जि. प. चा कारभार हे चक्क वेगवेगळे करावेत व नियोजन स्थानिक यंत्रणेने पंचायतीमार्फत आपापल्या शिफारसी अंमलांत आणवाव्या असे का सुचविले नाही ? जि. प. कारभारामुळे ठराविक जातीतच जागृति झाली असेल तर उदासीन वर्ग जागृत करण्यासाठी व जि. प. कारभारात त्यांना सहभागी करण्यासाठी कोणते उपाय योजावेत हे समितीने का सुचविले नाही ? जि प. कारभारात गटबाजी वाढली आहे असे एड्रियन मेयर म्हणतात पण हे गट कोणकोणत्या कारणांनी उत्पन्न झाले हे मेयर यानी आपल्या विवेचनात स्पष्ट केले नाही. गटबाजी डाव्या उजव्या वादाची, की स्थानिक अभिमानामुळे उत्पन्न झालेली, की व्यक्तिप्रतिष्ठेमुळे चढीस लागलेली, की जात तिला खत पाणी घालते हे काहीच स्पष्ट नाही !

बोंगिरवार समितीच्या शिफारसीबद्दल बोलावयाचे तर तिच्या शिफारसी दोषदिग्दर्शनात स्पष्टवक्त्या पण उपायनिदर्शनात अपरिपक्व व पुरेसे धैर्य न दाखविणाऱ्या आहेत. सरकारने समित्या नेमाव्या, त्यांच्या बैठकांवर खर्च करावा व समितीने भोंगळ आशावादी अहवाल प्रसिद्ध करावे आणि लोकनियुक्त विधिमंडळाने तो फारशी चर्चा न करताच मंजूरही करावा असे हे आजच्या लोकशाहीचे केविलवाणे चित्र आहे !

◆ ◆ ◆




डॉ. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध आणि त्याचे निंदक

## : ७ :

सत्तावनच्या निंदकांची विचारसरणी किती रोगट आहे याचा प्रत्यय घ्यायचा असेल तर ती सुसंगतपणे साऱ्या इतिहासाला लावून पहावी म्हणजे जगात स्वातंत्र्ययुद्ध असे नाव देता येण्यासारखी घटना कुठे घडलीच नाही असा निष्कर्ष काढावा लागतो. इलस्ट्रेटेट वीकली ऑफ इंडिया मध्ये बेचाळीसच्या उठावाबद्दल एक लेख आला होता तो या संदर्भात वाचण्यासारखा आहे. या लेखात सत्तावनचा उठाव हे स्वातंत्र्ययुद्ध नव्हते हे ओळखण्याइतकी "प्रगती" भारतीय विचारवंतांनी केली आहे. आता तोच न्याय बेचाळीसच्या उठावाला लावण्याचे पुढचे पाऊल त्यांनी उचलले पाहिजे असे लेखकाचे म्हणणे होते.

### क्षुद्र दंगा

असे पाऊल उचलणे फारच सोपे आहे. "बेचाळिस साली ब्रिटिशांना हुसकून लावून टीचभर जमिनीवर पळभराचे राज्य देखील भारतीयांना कुठे स्थापन करता आले नव्हते, नुसती 'टपालघरे जाळणे व गाड्यांचे' रूळ उखाडणे अशी विध्वंसक कृत्ये केली गेली, लक्षावधी भारतीय इंग्रजांच्या सैनिक व असैनिक नोकऱ्या इमाने इतबारे करीत राहिले व ब्रिटिश व्यवस्थेत एका दिवसाचाही खंड पडला नाही. तसेच या उठावामागे काहीही योजना नव्हती, तो जनतेचा स्वयंस्फूर्त उठाव होता असे खुद्द महात्मा गांधी व पंडित नेहरू यांनी म्हटले होते.

या उठावाला जनतेचा पाठिंबा होता हेदेखील चर्चिलने मान्य केले नव्हते. त्याला मुसलमान व हरिजन यांची सहानभूति नव्हती. देशी वृत्तपत्रे उठावाच्या घातपाती स्वरूपाची निंदाच करीत होती. जनतेचे एक पुढारी लोकनायक अणे यांनी उठावाचा जाहीरपणे निषेध केला होता.

सारांश बेचाळिसचा उठाव हा "एक क्षुद्र दंगा होता."

नेताजी सुभाषचंद्र बोस यांचे दुसरे स्वातंत्र्ययुद्ध देखील असेच निकालात काढता येते : "नेताजींची आझाद हिंद फौज ही जपान्यांची हस्तक फौज होती,

अनुक्रमणिका

जपानी तुरुंगातील छळाची भीति व जपान्यांची प्रलोभने या आझाद हिंद फौजेत शिरणाऱ्यांच्या मूळ प्रेरणा होत्या, त्यात देशभक्तीचा कुठेही संबंध नव्हता. नेताजींना काँग्रेसने हाकून दिले व देशात पुढारीपणाला काही स्थान उरले नाही म्हणून नशीब काढण्यासाठी नेताजी देशाबाहेर गेले, तेव्हा जर्मन व जपानी यांनी त्यांचा उपयोग करून घेतला व त्यांनीही आपली पुढारीपणाची वैयक्तिक महत्वाकांक्षा पुरी करण्याची ही संधी साधली.

आझाद हिंद फौजेमागे योजना असलीच तर ती जपान्यांची होती, भारतीयांची नव्हती. पेशवाईचे वारस म्हणून सत्तावनचे शिपाई जसे नानासाहेबाकडे वळले तसेच भारताचे प्रथितयश पुढारी म्हणून आझाद हिंद फौज आयती नेताजींच्या स्वाधीन करण्यात आली."

"आझाद हिंद फौजेला जनतेचा पाठिंबा होता असेही म्हणण्याची सोय नाही. 'नेताजींचा मार्ग चुकला आहे, त्यांनी भारतात पाय ठेवला तर मी त्यांच्याशी लढेन' असे अनेक लोकनेते बोलत. लढाई सुरू असेपर्यंत भारतातील वर्तमानपत्रांनी आझाद हिंद फौजेच्या बाजूने प्रचार केला नाही. लढाई संपण्याच्या सुमारास आझाद हिंद फौजेचे जे वृत्तांत प्रसिद्ध झाले त्यातील सूर बराचसा प्रतिकूल होता."

## अमेरिकन स्वातंत्र्ययुद्ध

या मजुमदारछाप निंदेचे उत्तरही स्पष्ट आहे. बेचाळिसचा उठाव करणाऱ्यांनी केवळ नासधूस केली हे खरे असले तरी या नासधुशीचे प्रमाण देशव्यापी व दीर्घकालीन झाले तर ब्रिटिशांना राज्य करणे अशक्य होऊन काँग्रेसच्या हातात सत्ता द्यावी लागेल अशी त्यांना आशा वाटत होती. नासधुशीच्या मागची प्रेरणा स्वातंत्र्याची होती म्हणून हा उठाव स्वातंत्र्याचा ठरतो. तसेच आझाद हिंद फौजेने आझाद हिंद सरकारची स्थापना केली व "चलो दिल्ली" अशी रणगर्जना करून सिंगापूरपासून आसामच्या सीमेपर्यंत धडक मारली, म्हणून त्या सेनेचे युद्ध हे स्वातंत्र्ययुद्ध ठरते. योजना होती की नाही, कुणाची महत्वाकांक्षा गुंतली होती की नाही, कायदेशून्य वर्तन घडले की नाही हे सारे प्रश्न या दृष्टीने अप्रस्तुत आहेत; तसेच वर्तमानपत्री लिखाण व सरकारी नोकरांची राजनिष्ठा यावरून जनतेचा पाठिंबा या प्रयत्नांना नव्हता असे अनुमान काढणे बरोबर नाही, कारण वर्तमानपत्रावर बंधने होती, पाहिजे ते लिहिण्याचे त्यांना स्वातंत्र्य नव्हते. त्याचप्रमाणे ब्रिटिश सरकारच्या सामर्थ्याला फारसा धक्का लागला नसल्यामुळे सरकारी नोकऱ्या सोडून स्वातंत्र्याच्या चळवळीत सामील

अनुक्रमणिका

होण्याचे धैर्य फारसे कुणी दाखविले नसले तरी सरकारी नोकरांची सहानुभूति देखील त्या चळवळीच्या बाजूनेच होती हे सर्वांस माहीत आहे. यावरून अमुक सभेने सत्तावनच्या उठावाविरुद्ध ठराव पास केला व सय्यद अहमदासारख्या सरकीप्राप्त लोकांनी त्या उठावाची निंदा केली यावरून जनतेचा त्या उठावाला विरोध होता या मजुमदारी अनुमानाची किंमत काय हे स्पष्ट आहे.

सत्तावनच्या निंदकांची वादपद्धति वापरली तर भारतात कधीच स्वातंत्र्ययुद्ध वा स्वातंत्र्याची चळवळ झाली नाही असेच केवळ ठरत नसून जगात कुठेही स्वातंत्र्ययुद्ध हे नाव ज्याला शोभेल असे युद्ध झाले नाही असे मानावे लागेल. अमेरिकेतील स्वातंत्र्ययुद्धावरून १८५७ च्या उठावाला स्वातंत्र्ययुद्ध हे नाव देण्यात आले. पण १८५७ च्या उठावापेक्षा अमेरिकन उठावाला नावे ठेवणे अधिकच सोपे आहे, व लेकीसारख्या इतिहासकारांनी तेच केले आहे. अमेरिकनांनी केलेले तथाकथित स्वातंत्र्ययुद्ध हे स्वतःचा मायदेश जो इंग्लड त्याविरुद्ध केलेले युद्ध होते म्हणून त्याला स्वातंत्र्ययुद्ध न म्हणता देशद्रोह म्हणणे अधिक रास्त आहे. या युद्धात स्पेन व फरान्स या परराष्ट्रांनी मदत केली व या मदतीशिवाय अमेरिकनांना यश मिळणे अशक्य होते. म्हणजे एका दृष्टीने अमेरिकेचे तथाकथित स्वातंत्र्ययोद्धे हे केवळ देशद्रोहीच नव्हे तर परकीयांचे हस्तक देखील होते.

सत्तावनच्या युद्धाच्यामागे राजेरजवाड्यांचा स्वार्थ होता असे म्हणणाऱ्यांनी अमेरिकन युद्धाच्यामागे देखील विशिष्ट वर्गाचा स्वार्थ होता हे लक्षात ठेवले पाहिजे. ब्रिटिश सरकारने ईस्ट इंडिया कंपनीला वसाहतीमध्ये विक्रीस पाठविण्याच्या चहावर एकाधिकार दिला होता. कंपनीने फक्त आपल्याच अडत्यामार्फत व फारच स्वस्तदराने चहा विकण्यास सुरवात केली. त्यामुळे वसाहतीतील व्यापाऱ्यांचे नुकसान होऊ लागले व त्यांनी जहालाशी संधान बांधले. अशा एकाधिकारामुळे आज आमच्या चहाच्या व्यापारावर गदा आली. उद्या दुसऱ्याही व्यापारावर गदा येईल अशी या व्यापाऱ्यांना भीती वाटत होती. ब्रिटनने एकाधिकाराच्या बाबतीत वेळीच पड खाल्ली असती तर अमेरिकन व्यापाऱ्यांनी बंड केले नसते हे निश्चित. एकाधिकार रद्द केले तर १७६३ च्या पूर्वीप्रमाणे अमेरिका ब्रिटिश राजाच्या अंकित राहील असे काँग्रेसच्या दोन अधिवेशनांनी जाहीर केले होते. सारांश अमेरिकन स्वातंत्र्ययुद्ध हे आपला व्यापार बुडेल या भीतीने अमेरिकन व्यापाऱ्यांनी केलेले बंड होते.

## जॉर्ज वॉशिंग्टनचे निराशागीत

आता या युद्धाला जनतेचा पाठिंबा कितपत होता हे पाहू.

१७७५ पर्यंत नॉर्थ कॅरोलिना, पेन्सिलव्हानिया, न्यू जेरसी, न्यू यॉर्क आणि मेरीलॅण्ड येथील विधानसभांनी स्वातंत्र्ययुद्धाच्या विरुद्ध ठराव पारित केले होते. १७७६ पर्यंत वॉशिंग्टनच्या सैन्यात राजाच्या आरोग्याप्रीत्यर्थ सुरापान होत असे.

आयातनिर्यातीवर देखरेख करण्यासाठी अमेरिकन कॉंग्रेसने एक संघ स्थापित केला. या संघाबद्दल सॅम्युअल सीबरी नावाच्या एका राजपक्षीयाने असे उद्गार काढले की, आम्हाला गुलामच व्हायचे असेल तर आम्ही इंग्लंडच्या राजाचे गुलाम होऊ. या संघाच्या उपटसुंभ व बेकायदा सदस्यांचे आम्ही गुलाम का व्हावे ? " सीबरी सारखे हजारो राजनिष्ठ लोक अमेरिकेत होते.

अमेरिकेतल्या प्रत्येक वसाहतीत व प्रत्येक व्यवसायात स्वातंत्र्यविरोधी व राजनिष्ठ लोक होते. न्यू यॉर्क, न्यू जेरसी, पेन्सिलव्हानिया आणि कॅरोलिना येथे तर राजनिष्ठांचीच बहुसंख्या होती. सुमारे ७०००० लोकांनी स्वातंत्र्ययुद्धाला त्रासून देशत्याग केला. १८३० पर्यंत न्यू यॉर्क व पोर्टस्माउथ येथे राजाचा वाढदिवस साजरा करणारे लोक होते.

वरच्या वर्गातले लोक साधारणपणे राजनिष्ठ होते. यात राजाचे बरेच अधिकारी व धर्मगुरु यांचा समावेश होतो. व्हर्जिनिया व मेरीलॅण्ड येथले सोडून बाकी सारे जमीनमालक राजनिष्ठ होते. उत्तरेतील व्यापाऱ्यामध्ये देखील दोन तट होते. वकीलवर्ग राजनिष्ठ होता.

जॉन अडॅमस् नावाचा जहाल देशभक्त कॉंग्रेसच्या बैठकीहून घरी जात असता एक खेडूत त्याला म्हणाला :

"तुम्ही व तुमच्या सहकाऱ्यांनी हे काय मांडले आहे ? आता या प्रांतातून न्यायपीठे नाहीशी झाली आहेत."

स्वातंत्र्ययुद्धात सामील व्हायला सैनिक मिळेनात. १७७५ मध्ये वॉशिंग्टन लिहितो :

"समाजहिताबद्दल एवढी अनास्था, सदाचारहीनता, स्वार्थासाठी वापरण्यात येणाऱ्या हीन क्लृप्त्या मी कधी पाहिल्या नाहीत. मला याची कल्पना असती तर हे काम मी कधीच पत्करले नसते."

१७७६ साली वॉशिंग्टनचे सैन्य न्यूयॉर्कमध्ये नसते तर न्यू यॉर्क राजनिष्ठ राहिले असते. कारण प्रॉव्हिन्शियल कॉंग्रेसने ९ जुलै १७७६ पर्यन्त स्वातंत्र्यांच्या बाजूने मत दिले नव्हते. एप्रिलपर्यन्त ब्रिटिश सैन्य आले असते तर सारा इतिहास बदलला असता.

अनुक्रमणिका

## आपसातली भांडणे

युद्धाच्या अखेरीस अमेरिकनाशी लढण्यासाठी इंग्रज वा जर्मन शिपाई वापरण्याऐवजी अमेरिकन शिपाईच वापरणे श्रेयस्कर असे इंग्रजांना दिसून आले. न्यूयॉर्क मध्ये जार्ज वॉशिंग्टन पेक्षा, जॉर्ज ३ ला अधिक शिपाई मिळाले. न्यूयॉर्क शहरात जे अमेरिकन राजभक्त सैनिक होते ते लॉंग आयलंडच्या किनाऱ्यावर जाऊन लूटमार व इतर दुष्कृत्ये करीत. नॉर्थर्न पेन्सिल्व्हानियातील भयंकर "वायमिंग कत्तल" अमेरिकन सैनिकांनीच केली होती. दक्षिणेमध्ये स्वजनाशी लढणाऱ्या अमेरिकनांनी युद्धास फारच हिडिस स्वरूप आणले व वैयक्तिक हेवेदावे उगवून घेतले. कॅमडनची लढाई ही मुख्यतः अमेरिकनांनीच इंग्लंडसाठी जिंकून दिली. नॉर्थ कॅरालिनातील स्कॉच लोक अखेरपर्यंत राजनिष्ठ राहिले. पेन्सिल्व्हानिया व जॉर्जिया येथील हजारो वनचर युद्धकर द्यावे लागू नयेत वा युद्धात भाग घ्यावा लागू नये म्हणून पर्वतापलीकडे पळून गेले. लोकांच्या कर देण्याच्या नाखुषीमुळे वॉशिंग्टनच्या सैन्याची उपासमार झाली. १७८२ च्या सुमारास फरांसने पैशाची भक्कम मदत केली म्हणून बाजू सावरली.

सत्तावनच्या उठावात भारतीय एकात्मतेची भावना नव्हती असा आरोप करण्यात येतो. अमेरिकेतील स्वातंत्र्ययुद्धात जेव्हा न्यू इंग्लंड मुक्त करण्यात आले तेव्हा मिड्ल स्टेट्-स् वा दक्षिणेच्या मदतीस जाण्यास कोणी यांपैकी तयार होईनात. १७७५ च्या प्रारंभीच्या उत्साहानंतर उत्तरेत लढण्यासाठी दक्षिणेतले लोक मिळणे दुर्घट झाले. वॉशिंग्टनच्या सैन्यात जास्तीत जास्त अठरा हजार लोक होते. १७७६ सालच्या अखेरीस ही संख्या रोडावत पाच हजारावर आली.

अमेरिकेचे स्वातंत्र्ययुद्ध यशस्वी झाले व भारताचे मात्र फसले याचे कारण अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धाला जनतेचा पाठिंबा अधिक होता हे नाही. स्वातंत्र्ययुद्धाच्या पूर्वी देखील ९९ टक्के देश अमेरिकनांच्याच हातात होता. इंग्रजांच्या ठायी भारतीयांबद्दल जशी प्रखर द्वेषबुद्धि होती तशी स्वतःचेच बांधव जे अमेरिकन त्यांच्याबद्दल नव्हती. अमेरिकनाशी लढायला पुरेसे इंग्रज मिळाले नाहीत म्हणून जर्मन शिपाई भाड्याने आणले गेले.

१७७५ मध्ये क्वेबेकपासून फ्लोरिडाच्या सीमेपर्यन्त कोठेही ब्रिटिश सैनिक नव्हते. फक्त बॉस्टनमध्ये काही हजार होते. इंग्लंडहून सैनिक येण्यात शिडाच्या बोटीने पाच ते बारा आठवडे लागत.

अनुक्रमणिका

परांस उघडपणे अमेरिकेच्या बाजूने युद्धात शिरले, तेव्हा १७७९ मध्ये परांसचे मित्रराष्ट्र म्हणून स्पेनही अमेरिकेच्या बाजूने युद्धात पडले. स्पेनमुळे न्यु ऑर्लीस हा अमेरिकन प्रायव्हेटिअर्सना आपला तळ बनविता आला. स्पेनने वेस्ट फ्लारिडातील ब्रिटिश ठाणी देखील काबीज केली. याची स्वातंत्र्ययुद्धात सफलता मिळवण्याच्या दृष्टीने बरीच मदत झाली.

## रशियन शिपायांचे बण्ड

इतके होऊनही अमेरिकेला निर्णायक जय मिळाला नाही. पॅरिसचा तह झाला तेव्हा ब्रिटिशांच्या हातात न्युयार्क, चार्लस्टन, सँव्हाना व उत्तर पश्चिमेतील सात ठाणी होती. वॉशिंग्टनचे सैन्य अधिक काही करण्यास असमर्थ होते व ब्रिटिशांची समुद्रावरील सत्ता अनिर्बंध होती. असे असून पॅरिसचा तह अमेरिकेला अनुकूल झाला. कारण आपल्याच बांधवाशी अटीतटीने लढण्याची ब्रिटिशांची इच्छा नव्हती. उलट भारतीयाकडून पराभव पत्करण्यास इंग्रज स्वप्नातही तयार नव्हते, म्हणून त्यांनी १८५७ साली भारतीयाविरुद्ध आपले सर्व सामर्थ्य पणास लावले.

सत्तावन साली बंड करून उठलेले शिपाई बंडासाठी साधनसामग्री गोळा करण्यासाठी स्वजनावर कसे अत्याचार करीत याचे मजुमदार प्रभृतींनी बरेच तिखटमीठ लावून वर्णन केले आहे. त्याच्या जोडीला अमेरिकन स्वातंत्र्य युद्धातील 'देशभक्त समित्यां'च्या कारवायांचा वृत्तांत वाचण्यासारखा आहे. या समित्या जे नव्या राष्ट्राशी इमानदार नाहीत असे त्यांना वाटत होते; त्यांचे धन लुटीत व त्यांना अटकेत ठेवत. इंग्लंडशी राजनिष्ठ असलेले ७०००० लोक या बंडखोरांच्या भीतीने इंग्लंडात पळून गेले व अमेरिकन बंडखोरांनी आपला कसा छळ केला याची रसभरित वर्णने करून लोकांस भडकविण्याचा प्रयत्न करू लागले. मॉरिसन व कॉमेजर या इतिहासकारांच्या मते छळाच्या या कहाण्या खऱ्या होत्या.

स्वातंत्र्ययुद्धाला मदत करणारे प्रायव्हेटियर हे चाच्यांच्या जातीचे होते. प्रायव्हेटियर्सची जहाजे व माणसे यांचा खर्च अमेरिकन सरकार करीत नसे. गलबते लुटून ते आपला खर्च भागवीत.

सारांश मूठभर लोकांचा स्वार्थ, जनतेचा पाठिंबा नसणे, लूटमार, वगैरे आक्षेप सत्तावनच्या युद्धापेक्षाही अमेरिकन युद्धाला अधिक लागू होतात.

१८५७ च्या उठावाची रशियन राज्यक्रांतीशी तुलना करणे उद्‌बोधक होईल. ऑक्टोबर १९१७ च्या बोल्शेविक क्रांतीला स्वातंत्र्ययुद्ध हे अभिधान

दिले जात नाही, कारण त्या क्रांतीने अस्तित्वात आणलेले राज्य झारशाही या स्वकीय सत्तेच्या नाशावर उभारलेले होते. तरीपण १८५७ चा उठाव ही शिपायांच्या बंडाच्या स्वरूपाची एक क्षुद्र घटना होती असे म्हणणारे देखील रशियन क्रांती ही जगाच्या इतिहासाला कलाटणी देणारी घटना होती हे कबूल करतात. म्हणून अशा महत्त्वाच्या क्रांतीत व १८५७ च्या उठावात किती साम्य होते हे दाखवून दिले म्हणजे सत्तावनच्या– निंदकांची दृष्टी किती पंगु आहे हे स्पष्ट होईल.

मजुमदाराचा जाडा मुद्दा योजनाबद्धतेबद्दल आहे. या बाबतीत रशियन क्रांतीचा नंबर सत्तावनच्या खालीच लागतो. रशियन क्रांतीत जे विजेते ठरले त्या बोल्शेविकांनी १९१७ ची क्रांती आम्ही सयोजन घडवून आणली असा दावा सांगणारे बरेच लिखाण केले असले तरी हे सर्व कल्पनाजाल आहे असे बहुतेक अबोल्शेविक इतिहासकारांचे मत आहे. लेनिनने रशियाच्या बाहेरील परिषदा-मध्ये सर्व जगातील कामगारांना क्रांतीचे आवाहन केले होते. पण हे आवाहन रशियात कुणाच्याही कानी पडले नाही. मार्च १९१७ मध्ये झालेले संप ही क्रांतीची पूर्व सूचना होती हे इतराप्रमाणेच बोल्शेविकांना देखील स्वप्नातही वाटले नाही, व या संपांना सुरवातीला त्यांनी विरोधच केला.

## सिगारेटचे थोटुक

ऑक्टोबरमध्ये बोल्शेविक क्रांती यशस्वी होण्याच्या आधी जुलैमध्ये एकदा लेनिनने उठाव करविला होता. तो अंगाशी आला व चारशे लोक नाहक प्राणास मुकले. तेव्हा आपला या उठावाशी संबंध नाही म्हणून लेनिनने कानावर हात ठेवले. आपला बंडाशी संबंध नाही असे म्हणणारी राणी लक्ष्मीबाईची पत्रे दाखवून 'बंडा'च्या पूर्वयोजनेशी तिचा काही संबंध नव्हता असे मजुमदार सिद्ध करू पाहतात. लेनिन हरला असता तर वरील घटनेच्या आधारे त्याचाही क्रांतीत हात नव्हता असे मजुमदारांनी प्रतिपादले असते.

सत्तावनप्रमाणे रशियन क्रांतीचे कर्तृत्व देखील मुख्यतः रशियन सैनिकाकडेच जाते. कामगारांचे संप मोडण्यासाठी झारने पाठविलेली सैन्ये कामगारांनाच मिळाली. १८५७ साली काही शिपाई बंड करून उठले तरी बहुतेक सैन्य ब्रिटिशनिष्ठच राहिले. त्याच्या भरीस सुमारे १ लक्ष ब्रिटिश सैन्य सुसज्ज होते. उलट झारचे सारेच सैन्य राजद्रोही झाले होते. झार पदच्युत झाला तो लढाई वाचूनच.

सोव्हिएट सरकारने लेनिन हा जर्मनांचा भाडोत्री हेर आहे असे सिद्ध करणारे कागदपत्र प्रकाशित केले. त्याने लोक भडकले व बोल्शेविकांचे मुखपत्र जे प्रवदा त्याच्या छापखान्यांची त्यांनी नासधूस केली. लेनिन फसला असता तर अशासारख्या घटनांच्या आधारे रशियन क्रान्तीला लोकमताचा पाठिंबा नव्हता असा प्रचार सहज करता आला असता.

रशियन क्रान्तीच्या एका अवस्थेत ज्या निरनिराळ्या उपराष्ट्रांचे मिळून रशिया हे बहुराष्ट्रीय राज्य झाले आहे, त्यांनी आपली वेगळी सरकारे व सैन्य स्थापन करून सवते सुभे उभारले. यामुळे फार गोंधळ माजला. शहराशहरातून ब्रेडसाठी दंगे होऊ लागले. खेड्यातून जबरदस्तीने जमिनी बळकावण्याचे सत्र सुरू झाले. सशस्त्र सैनिक देशभर फिरून लूटमार व रक्तपात करू लागले. दळणवळणाची सारी साधने त्यांनी नष्ट केली.

सारांश पूर्वयोजना, जनतेचा पाठिंबा, राष्ट्रीय एकात्मता, लूटमारीचा अभाव वगैरे कोणत्याच निकषावर रशियन क्रान्तीला सत्तावनच्या क्रान्तीच्या वर स्थान देता येत नाही.

फ्रेंच राज्यक्रान्ती ही एक महान् घटना समजली जाते. या क्रान्तीमुळे लोकशाहीला चालना मिळाली व समता, बंधुता आणि स्वातंत्र्य या मूल्यांचे महत्व स्थापित झाले असे समजतात. पण सत्तावनच्या निंदकाचा चष्मा वापरला तर ही घटना देखील लुटालूट व खुनाखुनी म्हणून निकालात काढता येते. एकतर फ्रेंच राज्यक्रान्तीचे स्वरूप राष्ट्रव्यापी नव्हते, फक्त पॅरिसपुरते मर्यादित होते. बव्हंश सैन्य बादशहाशी एकनिष्ठ होते. पण बादशहाच मेषपात्र असल्यामुळे त्याने वेळेवर बलप्रयोग केला नाही म्हणून सिगरेटच्या ठिणगीने शहर पेटावे तशी फ्रेंच क्रांती पेटली. जमावाने बादशहाच्या महालावर मोर्चा नेला तेव्हा शाही रक्षकांनी त्याच्यावर गोळ्या झाडल्या. त्याबरोबर जमावाची पांगापांग होऊन तो पळू लागला. पण बादशहाने पुढे होऊन प्रजेवर बलप्रयोग करण्यास मनाई केली. रक्षकांनी शस्त्रे खाली ठेवली पण याबद्दल जमावाला बादशहाबद्दल काही कृतज्ञता वाटली नाही. उलट त्याने पुनः हल्ला केला.

### पिवळे पत्रकर्म

या क्रान्तीच्या मागे कोणतीही दूरगामी योजना नव्हती. यशस्वी झाल्यावर क्रान्तिकारकानी गिलोटिनच्या खाली नाहक हजारो नागरिकांच्या माना कापल्या. नेपोलियनच्या मते ही लोकशाही नसून गुंडशाही होती. नेपोलियन

हा परेंच क्रान्तीतून जन्माला आला, म्हणून त्याने परेंच क्रान्तीची अधिक बदनामी केली नाही. पण नेपोलियन ऐवजी, ज्या बरबाँन वंशाचा क्रांतिकारकांनी निःपात केला त्यांना क्रान्ति दडपण्यात यश आले असते तर एक गुण्डगर्दी म्हणून परेंच राजक्रान्ति इतिहासात नमूद झाली असती.

सर्वसाधारणपणे एखाद्याच्या मतावर टीका करताना त्याच्या हेतूची चर्चा करणे शिष्टाचाराला सोडून असल्याचे समजले जाते. पण सत्तावनच्या निन्दकांनी आपल्या निन्देची इमारत नानासाहेब पेशवे, राणी लक्ष्मीबाई व राजा कुमारसिंग यांच्या हेतूंच्या चर्चेवर उभारली आहे. तेव्हा सत्तावनची निन्दा करण्यामागे त्यांचे हेतु काय आहेत याची मी चर्चा केली तर त्यांना तक्रार करण्यास जागा नाही. दुसरे असे की निव्वळ ऐतिहासिक सत्यान्वेषणाच्या दृष्टीने देखील निन्दकांच्या हेतूंची चर्चा आवश्यक आहे. कारण कोणत्या बौद्धिक वातावरणातून या निन्देचा जन्म झाला आहे हे त्यावरून स्पष्ट होईल.

सत्तावनची निन्दा करण्याची प्रवृत्ति बंगाली इतिहासकारात विशेष आहे. याची कारणे या इतिहासकारांच्याच लिखाणात स्पष्टपणे सापडतात. मजुमदार व सरकार हे इतिहासकार राणी लक्ष्मीबाई व शिवाजी महाराज वगैरेंच्या ठायी राष्ट्रीय भावना होती की नाही असा प्रश्न उपस्थित करतात. पण राष्ट्रीय भावनेचा त्यांना स्वतःला काडीचाही अनुभव नव्हता हे त्यांच्या ठिकाणावरून स्पष्ट आहे. बंगाली प्रान्तीयते पलीकडे या लेखकांना कोणत्याही सामाजिक भावनेचा अनुभव असल्याचे दिसत नाही. जदुनाथ सरकारांच्या मते बंगालच्या इतिहासातील ब्रिटिश युग हे ग्रीसच्या इतिहासातील पेरिक्लीसच्या युगासारखे वैभवशाली होते. अशा या "वैभवशाली" बंगालने ब्रिटिशांकडून ज्या राष्ट्रीयतेचे धडे घेतले तिचेच पाठ साऱ्या भारताला दिले. अर्थात् बंगालचे "पुनरुज्जीवन" होण्याच्या आधी भारतात राष्ट्रीयतेसारख्या सुधारलेल्या चिजा असण्याचा संभव नाही. तेव्हा १८५७ च्या "बण्डखोरांची" कृत्ये तर दूरच राहू द्या, शिवाजी, राणाप्रताप वगैरे पुरुषांच्या कृत्यात देखील राष्ट्रीयता, देशभक्ति वगैरे प्रेरणा शोधू जाणे त्यांच्या मोटारीचा रंग शोधू जाण्यासारखेच हास्यास्पद आहे.

मजुमदारांनी हा बंगाली प्रांतीयवाद इतक्या थराला नेला आहे की शशांक या बंगाली राजाचे शत्रुत्व केल्याच्या महान् अपराधाबद्दल सम्राट हर्षवर्धनासारख्या राजर्षीची त्यांना निन्दा करावीशी वाटली, व ही निन्दा करताना

बाणभट्ट व ह्यूएनत्संग या समकालीन लेखकांच्या अस्सल साक्षी त्यांनी अस्वीकारार्ह ठरविल्या आहेत. दीड हजार वर्षांपूर्वीच्या घटनांचा विचार करताना देखील ज्या माणसाच्या मनावर बंगाली प्रान्तीयतेचा पगडा कायम राहतो तो, ज्या सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धात इंग्रजी शिकलेल्या बंगाली बाबूंना फिरंग्याची कुलंगी कुत्री म्हणून लोक सतावीत, त्याची निंदा करण्यास प्रवृत्त होईल हे अपेक्षितच आहे. The Bengali Babus as writing English were attacked या वाक्यावरून मजुमदारांच्या पोटात का दुखते हे स्पष्ट आहे.

जनता बंगाली बाबूंच्या विरुद्ध होती ती ते बंगाली म्हणून नव्हे तर परसत्तेचे हस्तक म्हणून इंग्रजी न शिकलेल्या बंगाल्यांना क्रांतिकारकांनी त्रास दिला नाही या घटनेचा अन्वयार्थ समजण्याइतकी राष्ट्रीयता या इतिहासकारात नाही.

दुसरा खावया न. र. फाटकांचा आहे. न. र. फाटकांचे लिखाण हे पिवळ्या पत्रकाराचे लिखाण आहे, सत्यनिष्ठ संशोधकाचे लिखाण नाही. फाटकांच्या प्रतिपादनाच्या मागे पुढील धोरणे असतात : (१) आपल्या प्रतिपादनाने वादाची धुळवड उडाली पाहिजे. (२) ब्राह्मणद्वेष्टया वर्गाला गुदगुल्या होतील असे त्याचे स्वरूप असले पाहिजे. सत्तावनची निंदा करण्यात फाटकांचे हे हेतु सूर्यप्रकाशाइतके उघड आहेत. सत्तावनच्या शताब्दीच्या वेळी त्यांनी आपली कुत्सित निंदा ओकली नसती तर त्यांच्या याविषयावरील लिखाणाची कोणी दखल घेतली नसती. केवळ संशोधनमूल्यासाठी कोणी फाटकांच्या लिखाणाकडे ढुंकून पाहील इतकी कुवत फाटकात नाही. नानासाहेब, तात्या टोपे, राणी लक्ष्मीबाई वगैरे सत्तावनचे पुढारी ब्राह्मण होते म्हणून त्यांना शिव्या दिल्यास ब्राह्मणद्वेष्टया वर्गास बरे वाटेल अशी फाटकांची अटकळ आहे. याच अटकळीनुसार रामदासांचा राजकारणाशी काहीच संबंध नव्हता, राजकारण हा शब्द चातुर्य या अर्थी त्यांनी वापरला असे त्यांनी तारे तोडले आहेत !

◆ ◆ ◆

डॉ. के. वा. आपटे

# भगवद्‌गीता-मोक्षमार्गांचे विवेचन : एक अध्ययन

आतापर्यंत सांगितलेले मोक्षमार्गाचे विवेचन लक्षात घेतल्यावर, जे काही विचार सुचतात, ते आता पुढे दिलेले आहेत :–

( १ ) पूर्वसिद्धतेची आवश्यकता

उपर्युक्त चार मार्गांपैकी कोणत्याही एकाचे आचरण करण्यापूर्वी साधकाला काही पूर्वसिद्धतेची आवश्यकता आहे. त्या त्या मार्गाच्या वैशिष्टचानुसार ही पूर्वसिद्धता जरी थोडीफार बदलत असली, तरी चारही योगांच्या पूर्वसिद्धतेत काही साधारण गोष्टी आढळतात, त्या पुढीलप्रमाणे :– ( १ ) इंद्रियसंयम आणि मनःसंयम ( अथवा आत्मसंयम ) – सामान्यत: संयम– हे अत्यावश्यक आहेत. ( २ ) क्रोधात परिणत होणारा काम ( आणि त्याच्या अनुषंगाने येणारे लोभ, इत्यादि ) हा त्याज्य आहे. ( ३ ) पुरुष हा श्रद्धामय आहे. त्यामुळे श्रद्धा हाही एक साधारण घटक आहे. ( ४ ) आणि सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास असे दिसून येते की अहंकाराचा अभाव हाही आणखी एक साधारण घटक आहे.

( २ ) प्रत्येक मार्ग स्वतंत्रपणे मोक्षदायक :–

भगवद्‌गीतेतील चारही योगांचे वर्णन वाचल्यावर, एक गोष्ट अशी आढळते की एक योग दुसऱ्यात मिसळण्याचा म्हणजे एका मार्गाचे वर्णन चालू असताना तेथेच दुसऱ्या मार्गाचा उल्लेख करण्याचा प्रयत्न सापडतो. उदा – कर्मयोग सांगताना, ज्ञान आणि भक्ति यांचा निर्देश येतो: पातंजलयोगाच्या धर्तीचा योग वर्णन करीत असताना, भक्तीचे उल्लेख आढळतात. ज्ञानयोगाचे विवेचन चालू असताना, भक्तीचा निर्देश येतो; आणि भक्तियोगाच्या विवेचनात ज्ञान आणि कर्म यांचे निर्देश येऊन जातात. हे पाहिल्यावर असे वाटण्याचा संभव आहे की या चार मार्गांपैकी दोन किंवा

अनुक्रमणिका

अधिक मार्गांचा समन्वय[१] सर्वांसाठी सांगण्याचा भगवद्गीतेचा हेतु आहे. पण सर्वांकरता भगवद्गीतेने अनेक मार्गांचा समन्वय सांगितलेला आहे, हे म्हणणे बरोबर[२] नाही. हे मार्ग परस्परावलंबी नसून, ते स्वतंत्रपणे मोक्षदायक आहेत. हे मार्ग स्वतंत्रपणे मोक्षाला नेण्यास समर्थ आहेत, असे भगवद्गीतेचे स्पष्ट मत दिसून येते. आणि त्या दृष्टिकोनातूनच, 'काही लोक ध्यानाने आत्म्याला पाहतात, काही जण सांख्य (ज्ञान) योगाने आत्म-दर्शन घेतात, तर काही माणसे कर्मयोगाने आत्म्याला[३] पहातात', अशा श्लोकार्थाची संगति लागते. तसेच, दैवी संपद् ही मोक्षाला नेते (दैवी संपद् विमोक्षाय। १६-५); आणि ही दैवी संपद् कोणत्याही एका मार्गा-वलंबनाने अथवा स्वतंत्रपणे साध्य होण्याची शक्यता आहे. आणि ही वस्तु-स्थिती भगवद्गीतेला मान्य असलेल्या (तळटीप २ पहा) अधिकारभेदाच्या तत्त्वाला अनुसरूनच आहे. कारण या अधिकारभेदाच्या तत्त्वानुसार समन्वय हा सर्वांसाठी असू शकत[४] नाही.

भगवद्गीतेने सर्वांसाठी समन्वय (वा समुच्चय) सांगितलेला नाही; याउलट प्रत्येक मार्ग स्वतंत्रपणे मोक्षाप्रत नेतो असे भगवद्गीता सांगते; हे म्हणण्यास पुढील कारणे आहेतच :– (१) प्रत्येक योग सांगताना तोच योग श्रेष्ठ आहे, असे भगवद्गीतेने सांगितलेले आहे. निराळ्या शब्दात सांगायचे झाल्यास, भगवद्गीतेला एकयोगश्रेष्ठत्व मान्य आहे. (२) काही स्थळी या योगांची तुलना करून, त्यांची सुलभता किंवा कठिणता दाखविण्याचा प्रयत्न भगवद्गीतेने केलेला आहे. भगवद्गीतेला समन्वय अभिप्रेत असता तर या तुलनेला काही अर्थच रहात नाही, हे उघड आहे (३) 'सांख्य' आणि 'योग' हे

---

१ कारण भगवद्गीता ही सार्वजनीन आहे असे म्हटले जाते, आणि भ. गी. मध्ये समन्वय आहे असे म्हटल्यास तो सर्व साधकांसाठी किंवा मुमुक्षूंसाठी आहे असा अर्थ होतो.

२ या प्रश्नाचे विस्तृत विवेचन 'भगवद्गीता : मोक्षोपदेश', नवभारत, जुलै १९५७ या माझ्या लेखात येऊन गेलेले आहे.

३ ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे ॥ १३.२४

४ भ. गी. मध्ये दोन वा अधिक मार्गांचा समुच्चयही सांगितलेला नाही. पहा – भगवद्गीता : मोक्षोपदेश, नवभारत, जुलै १९५७.

एकच आहेत, असे भगवद्गीतेचे सांगणे आहे. ते दोघे स्वतंत्रपणे मोक्षमार्ग म्हणून जर भगवद्गीतेला अभिप्रेत नसते, तर ते दोन्ही एकच आहेत, या म्हणण्यात काही स्वारस्य उरत नाही (४) 'मय्येव मन आधत्स्व ... यतात्मवान्' (१२·८–११) या श्लोकात भगवद्गीतेने जे पर्याय सांगितलेले आहेत, त्यावरूनही हे स्पष्ट होते की हे चारही मार्ग स्वतंत्रपणे मोक्षाला नेणारे आहेत.

## (३) एकयोगश्रेष्ठत्व:–

भगवद्गीतेने एकयोगश्रेष्ठत्व सांगितले आहे, असे वर म्हटले होते. याच विधानाचे थोडे अधिक स्पष्टीकरण करणे आवश्यक आहे. एकाद्या योगाचे वर्णन चालू असताना, तोच योग (इतरांपेक्षा) श्रेष्ठ आहे, असे भगवद्गीता सांगून जाते: यालाच येथे एकयोगश्रेष्ठत्व असे म्हटले आहे. उदा– (अ) ज्ञानाचे महत्त्व सांगताना भगवद्गीता म्हणते:– ज्ञानासारखे पवित्रकारक या जगात दुसरे काहीही नाही (४·३८); सर्व कर्मे ज्ञानामध्ये परिसमाप्त होतात. (४·३३); ज्ञानाग्नि हा सर्व कर्मे भस्मसात् करतो (४·३७) अभ्यासापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे (श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् । १२·१२). (आ) पातंजलयोगाच्या धर्तीचे योग सांगून झाल्यावर भगवद्गीता म्हणते :– तपस्वी ज्ञानी आणि कर्मी यापेक्षा[६] योगी श्रेष्ठ होय. ज्ञानापेक्षा ध्यान विशेष आहे. (ज्ञानाद् ध्यानं विशिष्यते । १२.१२ ). (इ) ध्यानापेक्षा कर्मफलत्याग श्रेयस्कर आहे (१२.१२), या शब्दात कर्मयोगाचे महत्व भगवद्गीता सांगून टाकते. (ई) पुढीलप्रमाणे भक्तियोगाचे[७] महत्व भगवद्गीतेने नमूद केलेले आहे :– पर पुरुष म्हणजे ईश्वर हा केवळ अनन्य भक्तीने प्राप्त होतो. ( पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया । ८.२२ ). ईश्वराचे विश्वरूप दृष्टीला पडणे व ईश्वराला जाणून व पाहून त्याच्यात प्रवेश करणे, हे अनन्य भक्तीनेच[८]

---

५ तसेच :– ज्ञानी भक्त हा विशेष आहे ( ७.१७ ); ज्ञानी भक्त हा ईश्वराचा आत्मा आहे ( ७.१८ ).

६ तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद् योगी भवार्जुन ॥ ६.४६

७ तसेच : भक्ति करणारा योगी सर्व श्रेष्ठ आहे ( ६.४७ )

८ भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ११.५४

अनुक्रमणिका

शक्य आहे. अनन्य मनाने जो कोणी ईश्वराचे स्मरण करतो, त्याला ईश्वर सुलभ आहे. ( अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः । तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ ८.१४ ).

भगवद्‌गीतेतील मोक्षमार्गांच्या विवेचनात हे एकयोगश्रेष्ठत्व महत्त्वाचे आहे आणि याचे कारण म्हणून पुढील उत्पत्ती देता येईल। भगवद्‌गीतेच्या पूर्वीही ज्ञान, योग व भक्ति हे मार्ग प्रचलित होते आणि ते काही प्रमाणात प्रसिद्धि पावलेले होते आणि आपापल्या क्षेत्रात त्यांना महत्वही होते त्यांचे हे महत्व अथवा श्रेष्ठत्व डावलणे भगवद्‌गीतेला शक्य नव्हते. पण त्याच वेळी स्वतःला आवर्जून सांगावयाचा असणारा जो कर्मयोग त्याचे महत्त्वही भगवद्‌गीतेला प्रस्थापित करावयाचे होते. आणि या दोन्ही गोष्टी साधण्यास एकयोगश्रेष्ठत्व या एकाच मार्गाचा अवलंब भगवद्‌गीतेने केला आहे.

## ( ४ ) मार्गांची तुलना करा

(अ) सांख्य, संन्यास आणि कर्म :– सांख्य ( = ज्ञान) व कर्मयोग याचे बाबतीत भगवद्‌गीतेचे मत पुढीलप्रमाणे आहे :– सांख्य आणि योग हे वेगळे आहेत असे अज्ञानी किंवा मूर्ख लोक म्हणतात, पण शहाणी माणसे मात्र तसे म्हणत नाहीत ( सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः। ५-४ ) . सांख्य व योग एकच आहेत हे जो कोणी जाणतो तोच खरे जाणतो ( एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति । ५.५ ) . आणि या दोहोतील एकाचे जरी चांगले आचरण केले तरी फळ मात्र ( दोहोंचे ) मिळते ( एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम् । ५.४ ) : जे स्थान सांख्यानुयायांना प्राप्त होते तेच कर्मयोग्यानाही प्राप्त होते (यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते । ५.५). यावरून हे स्पष्टपणे प्रतीत होते की साध्याचे संदर्भात सांख्य व कर्मयोग यात फरक नाही.

संन्यास व कर्म : – (ज्ञानयोगातील) कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोग विशेष आहे ( कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते । ५.२). कर्मयोगाशिवाय संन्यास साध्य होणे अवघड आहे. (संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः। ५.६ ). कर्मफलावर अवलंबून न रहाता, कर्म करीत रहाणारा माणूस हाच खरा संन्यासी; केवळ क्रियारहित व निरग्नी असा मनुष्य मात्र संन्यासी नव्हे ( अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः । स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः॥ ६.१ ).

एका विशिष्ट सामाजिक[९] पार्श्वभूमीवर भगवद्गीतेने निष्काम कर्मयोग सांगितलेला आहे. आणि त्या दृष्टीने कर्मयोगाचे महत्त्व भगवद्गीतेने गाणे हे अगदी योग्य ठरते. समाजात राहून कर्तव्यकर्म करीत, जर अंतिम पुरुषार्थ म्हणजे मोक्ष साधता येतो, तर कर्मसंन्यास करा कशाला? या दृष्टिकोनातून पाहिल्यास कर्मयोग विशेष आहे यात शंकाच नाही.

असे असले तरी, तात्त्विक दृष्टचा संन्यास व कर्मयोग या दोहोत एकच तत्त्व असल्याने, 'जो संन्यास तोच कर्मयोग होय; कारण संकल्पाचा न्यास/त्याग केल्याविना कर्मयोगी[१०] होता येत नाही,' हे भगवद्गीतेला मान्य करावे लागले. संक्षेपाने सांगायचे झाल्यास, संन्यास व कर्मयोग हे दोन्हीही निःश्रेयसकारक-मोक्षदायक आहेत (संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ। ५.२). यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की कर्मयोगाची विशेषता ही साध्याचे बाबतीत नसून, सामाजिक जीवनात कर्मयोगाला जे वैशिष्टचपूर्ण स्थान आहे. त्यामुळे आहे.

## (आ) व्यक्तोपासना व अव्यक्तोपासना :-

व्यक्तोपासना (सगुण ईश्वराची उपासना) सुलभ आहे: पण अव्यक्ताच्या उपासनेत क्लेश आहेत, असे[११] भगवद्गीतेचे सांगणे आहे. भगवद्गीतेचे हे म्हणणे नीटपणे तपासले तर असे दिसते की ते आंशिक[१२] सत्य असून, अधिकारभेदाच्या तत्त्वाशी विसंगत आहे. असे म्हणण्याचे कारण पुढीलप्रमाणे आहे :- भिन्न भिन्न

९ ही सामाजिक पार्श्वभूमि निष्कामकर्मयोगाच्या विवेचनात सांगितलेली आहे. तसेच, के. वा. आपटे, कर्मण्येवाधिकारस्ते, नवभारत, मार्च १९६५, हा लेखही पहावा.

१० यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पाण्डव।
न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ ६.२

११ क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ १२.५

१२ भगवद्गीतेतील काही वचने आंशिक सत्ये आहेत. उदा- ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा (नवभारत, एप्रिल १९५६), यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः (जीवनविकास, जुलै १९६२), हे माझे लेख पहावेत.

मोक्षमार्ग हे भिन्न अधिकार असणाऱ्या साधकासाठी आहेत. तेव्हा ज्याला अव्यक्तोपासना सुलभ वाटेल तोच ती करावयास जाणार; आणि त्याच्या दृष्टीने ती क्लेशकारक होणार नाही. त्यालाही ती क्लेशकारक वाटत असल्यास, मुद्दाम क्लेश ओढवून घेण्याइतका तो मूर्ख आहे, असे समजावे लागेल. म्हणून अनधिकारी मनुष्याला अव्यक्तोपासना क्लेशकारक आहे, असे म्हणणे आवश्यक ठरते.

( इ ) पातंजलयोगाच्या धर्तीचा योग :–

असंयमी माणसाला पातंजलयोगाच्या धर्तीचा योग अवघड आहे, असे भगवद्‌गीता सांगते ( असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः । ६.३६ ). येथेच हेही लक्षात घेण्यास हरकत नाही की या योगाला अधिकारी असणाऱ्या माणसालासुद्धा थोडेफार शारीरिक कष्ट पडतातच.

( ई ) भक्तियोग व कर्मयोग सुलभ आहेत काय ?

भक्तियोग व निष्कामकर्मयोग हे आचरण्यास सुलभ आहेत, असे भगवद्‌गीतेचे मत दिसते. उदा– ( १ ) भगवद्‌गीता म्हणते की ईश्वराचे नित्य स्मरण करणाऱ्याला ईश्वर सुलभ आहे ( ८.१४ ). यावरून असे दिसते की स्मरण अंतर्भूत असणारा भक्तियोग हा भगवद्‌गीतेच्या दृष्टीने सुलभ आहे. ( २ ) श्लोक १२.८.११ यामध्ये भगवद्‌गीतेने सांगितलेल्या पर्यायांवरून असे दिसते की भगवद्‌गीतेच्या मताने, या पर्यायांतील उत्तरोत्तर पर्याय सुलभ आहे. या श्लोकांमध्ये सांगितलेले पर्याय पुढीलप्रमाणे आहेत :–

ईश्वराच्या ठिकाणी मन आणि[१३] बुद्धि ठेवावी ( १२.८ ). ईश्वराच्या ठिकाणी जर मन स्थिर करता येत नसेल तर अभ्यासयोगाने ईश्वरप्राप्तीची इच्छा करावी ( १२.९ ) अभ्यास करणेही शक्य नसेल तर ईश्वरासाठी कर्मे करावीत; ईश्वरासाठी कर्मे करूनही सिद्धि प्राप्त होते. ( १२.१० ). ईश्वरासाठी कर्मे करणेही शक्य नसेल, तर इंद्रियसंयम करून सर्व कर्मांच्या फळांचा त्याग करावा ( १२,११ ); कर्मफलत्यागाने शांति प्राप्त होते ( १२ १२ ). यावरून असे दिसते की कर्मफलत्याग अंतर्भूत असणारा कर्मयोग हा भगवद्‌गीतेच्या मताने सुलभ आहे.

---

१३ त्यामुळे निःसंशयपणे ईश्वरात राहता येते ( १२.८ ).

अनुक्रमणिका

कर्मयोग आणि भक्तियोग हे खरोखरच सुलभ आहेत काय ? त्या दोहो-मध्ये अभिप्रेत असणाऱ्या मध्यवर्ती तत्त्वाचा विचार केला की ते सुलभ आहेत की नाहीत हे कळून येते. कर्मयोगातले मुख्य तत्त्व म्हणजे निःसंगपणे फलाशा सोडून कर्म करणे; यासाठी अहंकाराचा अभाव अभिप्रेत आहे. आणि हे वाटते तितके सोपे नाही. तसेच, भक्तियोगातील मुख्य तत्त्व म्हणजे ईश्वराचे ठिकाणी अनन्य चित्तत्व, आत्यंतिक श्रद्धा आणि ईश्वराला संपूर्ण शरणागति. त्यामुळे परिणामी अहंकाराचा अभाव, हे होय आणि या गोष्टी वरवर वाटतात तितक्या सोप्या नाहीत, हे तज्ज्ञाला सहज समजून येते. अहंकाराचा त्याग हा महा-मुष्किल व दुःसाध्य आहे. साहजिकच अहंकाराचा त्याग समाविष्ट असणारे कर्मयोग तसेच भक्तियोग हे दिसतात तसे सुलभ नाहीत. संक्षेपाने सांगावयाचे झाल्यास कर्मयोग आणि भक्तियोग हे जरी सुलभ म्हटले जातात, तरी वरवर पाहिल्यास ते तसे वाटतात. पण आचारात आणताना मात्र ते सुलभ नाहीत.

येथपर्यंत भगवद्गीतेने सांगितलेल्या मोक्षमार्गांचे विवेचन, इत्यादि वैचारिक भाग पाहून झाला. आता वैचारिक दृष्टीने या मार्गांबद्दल काय वाटते ते सांगायचे आहे. मागे म्हटल्याप्रमाणे हे चार योग किंवा मार्ग हे अधिकार-भेदाच्या तत्त्वानुसार आहेत. याचाच अर्थ असा की अमुक एक मार्गच हा सर्वांना उपयुक्त असून, तो त्यांना चालण्यासारखा आहे व त्यांनी त्याचा आचार करावा, असे म्हणता येत नाही. एखाद्या मोक्षमार्गाची निवड आणि त्याचा आचार या दोन्ही गोष्टी साधकाच्या अथवा मुमुक्षूच्या अधिकारावरच अवलंबून असतात, हे उघड आहे. त्यामुळे ज्या साधकाला जो मार्ग पटेल, रुचेल आणि पेलेल त्याचा त्याने आचार करावा, हेच निष्पन्न होते.



भाई माधवराव बागल

# शिवछत्रपति

## शिवछत्रपति

भूत, वर्तमान व भविष्य कालाच्या पिढीचे स्फूर्तिस्थान. कालबाह्य होणारी ही व्यक्ती नव्हे. आजच्या कालाला जे जे पाहिजे ते सर्व गुण त्यांच्या व्यक्ति-जीवनात व राजकीय जीवनात आढळून येतील. साध्य आणि साधन याचा काथ्याकूट करीत व डोक्याला शिणवीत ते बसले नाहीत. त्यानी बोलीतून जगाला मार्ग दाखविला नाही, तो कृतीतून दाखविला.

त्यांच्यासमोर मुख्य ध्येय होते ते शेतकऱ्यावर होणाऱ्या सरदार व बडे जमीनदार यांच्या अन्याय निवारणेचं.

त्यांच्या इस्टेटीची, पिकाची धान्याची जी लूटमार चाललेली होती ती बंद करण्याचं. त्याना उपाशी मरण्याची पाळी येत होती, त्यातून मुक्त करण्याचं. या वेळचा प्रश्न उभा होता तो आर्थिक. निव्वळ भावनेचा नव्हता. धार्मिक नव्हता. शेतकऱ्यावर जुलूम करणारे सरदार, हे सर्व मोगल सम्राटाचे व बादशहाचे मांडलीक होते. म्हणजे पर्यायाने अन्यायाचे जबाबदार होते सम्राट व बादशहा. पण याची खरी जाणीव होती शिवबाला. तितकी जाण शेतकऱ्याला असणे शक्य नव्हते. दिल्ली हे नाव कानावर पडले असेल एवढेच. कारण आजच्यासारखी दळणवळणाची व बातम्या पोचवण्याची अगर ऐकण्याची साधने त्या वेळी नव्हती. आगगाड्या नव्हत्या. मोटारी नव्हत्या, विमाने नव्हती, तारायंत्रे नव्हती, टेलिफोन नव्हते, रेडियो नव्हते. प्रत्येक शेतकऱ्याचे संबंध दहावीस खेड्यापुरते. याचमुळे शिवाजी शेतकऱ्याचे सैन्य जे तयार करू शकला ते आर्थिक प्रश्नावर. पोटापाण्याच्या प्रश्नावर, पगार न घेता मावळे सैन्यात दाखल झाले ते यामुळे

बादशहाच्या सैन्याशी संबंध येऊ लागला, त्यांच्या स्वाऱ्या, मुलुखगिरीसाठी ज्यावेळी होऊ लागल्या, त्यावेळी आपल्या पारतंत्र्याची जाणीव होऊ लागली. व

अनुक्रमणिका







वाचून दाखवलेल्या आपल्या प्रबंधात लिहिले आहे. तसेच शिवाजीने राजा जयसिंगला लिहिलेल्या पत्रात, त्यातील आपले आश्वासनावर त्याचा विश्वास बसावा म्हणून 'अश्वाची शपथ ' दिली आहे. 'गोब्राम्हणाची ' नव्हे. तो गाईपेक्षा अश्वाला महत्व देतो. कारण युद्धात यश मिळवून देणारा व मालकाबरोबर आपणही जीव धोक्यात घालणारा इमानी प्राणी म्हणजे घोडा हा होय. त्यांचे महत्व खालील श्लोकात वर्णिलेले आहे :

'यस्याश्वा तस्य राज्यं । यस्याश्वा तस्य मेदिनी ।
,, ,, सौख्यं । ,, , ,, सामराज्यं ॥

तसेच हिंदुधर्म संस्थापक असे म्हणवून न घेता–त्यानी 'क्षत्रियकुलावतंस' –असेच म्हणवून घेतले आहे. म्हणजे खास ब्राह्मणवर्गाला खूष ठेवण्याचे पक्षपाती पेशवाई धोरण त्याने स्वीकारले नाही.

आपला राज्याभिषेक ब्राह्मण पुरोहिताकडूनच वेदोक्तपद्धतीने व्हावा म्हणून, गागाभटाला एक लाख होनाची लाच देऊन तयार केला. केवळ स्वतःच्या कर्तबगारीवर राज्य कमावणाऱ्या शिवाजीने असा राज्याभिषेक करवून घेण्याची तरी काय जरूरी होती ? ही दुर्बलता का दाखवली ?

माझ्या दृष्टीने ही दुर्बलता नसून ही राजकीय मुत्सद्देगिरी होय ! अशा प्रकारच्या धर्मविधीने राज्याभिषेक करवून घेतल्याखेरीज, सनातनी व धर्मभोळी हिंदू जनता व आढचता मिरवणारे मराठे सरदार व जहागिरदार व उणेपणा काढणारे इतर धर्मीय यांची त्याला मान्यता मिळाली नसती, अशी त्यावेळची सामाजिक परिस्थिती होती. म्हणून त्यांच्या त्या कालच्या कृत्याची आजच्या कालाच्या परिस्थितीशी तुलना करता येणार नाही.

त्याला चंद्रराव मोरे याने तू राजाच नव्हेस, तुझा राज्याभिषेक झाला नाही म्हणून हिणवत होता. म्हणून व सर्वसामान्य धार्मिकवृत्तीच्या समाजाची मान्यता मिळावी म्हणून भटाला आणला.

"पण राज्याभिषेकानंतर, वेदोक्त पद्धतीने राज्याभिषेक करणाऱ्या गागाभटावर, महाराष्ट्रातील काही ब्राह्मणानी जेव्हा बहिष्कार घातला तेव्हां त्या सर्व ब्राह्मणांना आपल्या नोकरीतून काढून टाकले."

दुसरी त्यावेळी क्रांतिकारक वाटणारी गोष्ट–

परधर्मात गेलेल्याला शुद्ध करून घेऊन हिंदुधर्मात घेणे हा अधिकार क्षत्रियाचा नव्हे. हिंदु धर्मग्रंथानी व संस्थापकानी असा अधिकार इतर कोणाला

दिलेला नाही. श्रीकृष्णाने तर 'स्वतःच्या धर्मात मरण हे श्रेयस्कर पण पर धर्म हा भयावह आहे' अशी भीती घातलेली. या आज्ञा रुढी व नियम धाब्यावर बसवून—

*

"फलटणच्या निंबाळकर घराण्यापैकी एका पुरुषाने मुसलमान धर्माची दीक्षा घेऊन एका मुसलमान स्त्रीशी लग्न केले होते. त्या पुरुषास त्या थोर विभूतीने पुनः आपल्या जातीत घेतले आणि आपल्या परमपूज्य श्री जिजाबाई साहेब यांच्या संमतीने ( रामदासाच्या अगर कोणा धर्मगुरूच्या संमतीने नव्हे ) त्यांनी निंबाळकरांच्या मुलाशी आपल्या स्वतःच्या मुलीचा विवाह करून दिला" ( खामगाव परिषदेतील शाहूछत्रपतींच्या भाषणातून २७।१२।१९१७ ).

*

— ही गोष्ट त्यावेळी क्रांतिकारकच होती. ब्राह्मणी रोषाची यावेळी त्यांनी फिकीर केली नाही.

म्हणून कोणत्या वेळी काय करावे याचे तारतम्य ठेवून राजकारणातही गनिमी कावा अवलंबिला आहे.

त्यांनी एक ध्येय डोळ्यासमोर ठेवले ते म्हणजे 'स्वातंत्र्य'— मैत्री त्यासाठी, शत्रुत्व त्यासाठी, डावपेच त्यासाठी, चढाऊ त्यासाठी, पडाऊ धोरण त्यासाठी, हिंदू सारखे मुसलमान सारखे. आपल्या जातीचे, आपल्या धर्माचे, गणगोतापैकी मराठे सरदार हे हिंदुधर्मीय म्हणून त्याना त्यांच्याबद्दल जिव्हाळा होता व मुसलमान म्हणून दावा होता असे मुळीच नाही. ते मराठे सरदाराबद्दल म्हणतात :

'बळकट व्हावे, दुसऱ्याचे घ्यावे, दावे दरवडे करावे, हा या मराठे सरदारांचा सहज हव्यास .. ... परचक्र आले म्हणजे वतनाच्या आशेने अगोदरच सलुखा करतात. स्वतः भेटतात. तिकडील भेद इकडे, इकडील तिकडे करून राज्यात शत्रूचा प्रवेश करतात.

याना— चंद्रराव मोरे, जाधव, घोरपडे, निंबाळकर, बांदल सावंत माने डबीर, याना खलास केले. खालील उतारा मा. म. देशमुख याच्या लेखातून घेतला आहे :

"शिवाजीविरुद्ध अनेक हिंदूनी विजापुरचा सुलतान आणि दिल्लीचा औरंगजेब या मुसलमान शासकाना मदत केली आहे. शिवाजीचे पिता शहाजी

अनुक्रमणिका

साधून घेण्यासाठी डोक्यावर घेऊन नाचायचे. ते साधेना की पायाखाली तुडवायचे !

आपल्याहून श्रेष्ठपद प्राप्त होऊ नये म्हणून राज्याभिषेक वेदोक्त पद्धतीने करण्यास नकार दिला. पण त्याचा काहीही उपयोग न होता राज्याभिषेक झाल्यानंतर त्याचे राज्यसंपादनाचे सर्व श्रेय काढून घेण्याकरता रामदासाचे गुरुपद त्यांच्या डोक्यावर लादायचे व राज्याभिषेकापूर्वी लेखणीच्या करामतीने रामदासाला तेथे उभारून त्यांचा आशीर्वाद घेऊन मग शिवछत्रपती सिंहासनाधिष्ठ झाले, असे नाटक रंगवायचे ! याच नाटकाचा आधार घेऊन आजची रंगभूमी नटवायची. व पडदे रंगवायचे, तशी चित्रे काढून घ्यायची बहुसंख्य पत्रे यांच्या हातात प्रचाराची साधने यांच्या हातात. आपल्याला हवा तसा इतिहास यानी रंगवायचा, महाराजानी म्हणे या गोसाव्याच्या झोळीत राज्य टाकले व त्याने ते उदार अंतःकरणाने परत दिले ! शिवाजीचे अफाट गुण वर्णन करायचे पण रामदासाला त्यांचे मार्गदर्शक बनवायचे ! सारा बनवा-बनवीचा प्रकार.

१९२५ सालची गोष्ट. त्यावेळी राजाराम हायस्कूल शुक्रवार पेठेत होते. त्या हायस्कूलच्या अय्यर नावाच्या हेडमास्तरने शाळेतर्फे एक त्रैमासिक काढले. त्यावर रामदास व शिवछत्रपती असे चित्र काढून घेतले ते कसे ? रामदास उभे आहेत. शिवछत्रपती ओणवे होऊन नतमस्तक प्रणाम करीत आहेत. आणि रामदास त्याना आशीर्वाद देत आहे. तो कसा ? डोक्यावर हात ठेवून नव्हे तर पंजा वर करून.

पण हे चित्र खपवून घेण्याइतके कोल्हापूर नामर्द नव्हते. त्यांची हजेरी कोल्हापूरच्या हंटर पत्राने पुण्याच्या विजयी मराठ्याने, बेळगावच्या राष्ट्रवीर पत्राने घेऊन त्याला सपशेल माफी मागायला लावली.

पण हा प्रयत्न तेथेच थांबला नाही पुनः नव्याने आमच्यासमोर डोके वर प्रसिद्धीस हपापलेल्या खानदानी मराठ्यातलाच एक कसबी कादंबरीकार पुढे सरसावला. त्या रणजित देसाईने अय्यरचा पडलेला कुंचला लेखणीने उचलून धरून रामदासाला राज्याभिषेकाअगोदर आपल्या कादंबरीत आशिर्वादासाठी आणून उभा केला नाही तरी पूर्वी मराठे सरदार शिवाजी महाराजांच्या उलट होतेच. त्यातलेच भूत पुनः जन्माला आले !! हा आपल्यातलाच म्हणून काही मराठ्यानीही त्याला उचलून धरले व त्याच जातीच्या पत्रानी त्याचा गौरव केला.

तथापि ऐतिहासिक संशोधनात ज्यांनी आपली हयात खर्चली अशा विद्वानानी साधार माहिती प्रसिद्ध करून सत्यावर झगझगीत प्रकाश पाडला आहे.

रियासतकार सरदेसाई यांनी दिलेली माहिती या विरोधकांचं चांगलेच थोबाड फोडणारी आहे. ती –

'१६५९ नोव्हेंबरला अफझुलखानाचा वध झाला. त्यापूर्वी फेब्रुवारी २८ चे पत्र भास्कर गोसाव्याचे दिवाकर गोसाव्यास आलेले उपलब्ध आहे ते :– मी शिवाजी राजाचे भेटीस गेलो होतो. त्यानी विचारले 'तुम्ही कोण ? कोणे ठिकाणीं असता ?' 'आम्हीं रामदासी. श्री समर्थाचे शिष्य. चाफळास राहतो' 'ते कोठे राहतात ?'

– याचा सरळ अर्थ यावेळेपर्यंत शिवाजीना रामदासाची काहीच माहिती नव्हती.

पुढे केव्हातरी समर्थानी खालील शब्द शिवाजीस टोचून उच्चारले 'तुमचे देशी वास्तव्य केले पण वर्तमान नाही घेतले.'

* * *

आचार्य भागवत– 'शिवाजीच्या कर्तृत्वाचा उगम रामदासाकडे आहे असे म्हणणे निराधार आहे. शिवाजीचे कर्तृत्व पाहूनच रामदासाला राजकीय विचार सुचले. एरवी सुचले नसते. रामदासानी समाजाला विषमता व जातीय दुरभिमान शिकविला.

रामदासाची शिकवण शिवछत्रपतीनी स्वीकारली असती तर महाराष्ट्राचे ऐक्य तर राहु देच पण हिंदूधर्मियामध्येही ऐक्य साधू शकले नसते. ती त्यांची विचारप्रणाली मी येथे मुद्दाम देत आहे.

ती मनुस्मृतिकालापासून ती आज या घटकेपर्यंत चालत आली आहे. तिचा अंमल पेशव्यानी पुनः कठोरपणे केला. ती सातारच्या राणा प्रतापाला भोवली व खाली उतरत ती शाहू छत्रपतीपर्यंत पोहचली. ती मनुस्मृती आंबेडकरांनी नवस्मृती निर्माण करून गाडली तरी तिचे प्रेत पुनः समाजाला व मुख्यतः अस्पृश्यांना भेडसावत आहे ! ! इतर धर्मियांच्या मागेही ते लागले आहे ती रामदासाची राक्षसी अमानुष वाणी :–

"गुरु तो सकलाशी ब्राह्मण। जरी तो झाला क्रियाहीन।
तरी तयासीच शरण। अनन्य भावे असावे ॥
ब्राह्मण वेद मूर्तिमंत। ब्राह्मण तोचि भगवंत।

पूर्ण होती मनोरथ। विप्र वाक्ये करूनी ॥
असो ब्राह्मणा सुरवर वंदिती। तेथे मानव बापुडे
किती। जरी ब्राह्मण मूढमती। तरी तो जगद्वंद्य ॥
अंत्यजे शब्द बरवा। पी तो नेऊना करावा। ब्राह्मणा
सन्निध पुजावा। हे तो न घडे कधी ॥
भेद ईश्वरे करोनी गेला। तो त्या बाचेनी नव्हेच मोडला।
मुखामध्ये घास घातला। तो आपानी घालावा ?

-- संत म्हणून उच्चवर्णियानी गौरवलेल्या याची ही भाषा. मग इतराची कोण असेल! राजा ढाले याची भाषा अभद्र म्हणणारे रामदासाच्या वाणीची शिफारस करतील काय ? आणि हे रामदास पुण्यश्लोक शिवछत्रपतीचे गुरु मार्गदर्शक व सल्लागार!

हे रामदास त्यांचे गुरु नव्हते. मार्गदर्शक नव्हते. राज्याभिषेकापूर्वी यांची व महाराजांची गाठ पडली नव्हती. असे मत खालील प्रसिद्ध इतिहाससंशोधकानी प्रसिद्ध केले आहे.

राजारामकॉलेजचे भूतपूर्व प्रख्यात प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण यानी, शिवचरित्रकार केळुसकर, प्रबोधनकार केशवरावजी ठाकरे, प्रा. न. र. फाटक, सेतु माधवराव पगडी, बेंद्रे, शिवाजी विद्यापीठाचे कुलगुरु डॉ आप्पासाहेब पवार यानी महाराजांची व रामदासाची राज्यारोहणापूर्वी गांठ पडली होती हे विधान खोडून काढले आहे.

शिवाजी महाराज हे परप्रत्ययनेय बुद्धीचे नव्हते. त्याचे कर्तृत्व स्वयं-प्रेरणेचे होते.

तेच आम्हा भारतीयांचे स्फूर्तिदाते आहेत.

पुढे चला हा संदेश देणारे दीपस्तंभ आहेत. शाहू, फुले, आंबेडकर यांची पार्श्वभूमी त्यानी तयार केली. आमच्या कालाचा विचार करून आम्ही पुढे पाऊल टाकले पाहिजे.

◆ ◆ ◆

डॉ. गणेश थिटे

# शिवतत्वरत्नाकर : एक धर्मकोश*

## पूर्वार्ध

शिवतत्वरत्नाकर हा संस्कृतमधील विश्वकोश बसवभूपाल ह्याने रचला असून त्यात ९ कल्लोल ह्या नावाचे विभाग आहेत. कल्लोलांची पुनः तरंगांमध्ये विभागणी केली असून अेकूण तरंग १०८ आहेत. प्रत्येक तरंगामध्ये कमी-अधिक संख्येचे श्लोक असून अेकूण श्लोकसंख्या सुमारे ३०,००० इतकी आहे. बसवभूपाल अुर्फ बसप्पनायक ह्याचा काळ अि. स. १६९४-१७१४ असा असून ( पहा : आर. रामशास्त्री संपादित शिवतत्वरत्नाकर भाग २, मैसूर, १९६९ अिंट्रोडक्शन पा. ५ ); ग्रंथरचनेचा काळ १७०९ अि. स. असा असावा ( पहा । अेस. नारायणस्वामीशास्त्री संपादित शिवतत्वरत्नाकर भाग १, भूमिका पा. ३ ). बसवभूपाल व त्याचे पूर्वज केळदि ह्या प्रदेशात राज्य करीत होते. हा प्रदेश स्थूलमानाने गोव्याच्या दक्षिणेला चन्ननोरपर्यन्त पसरला होता. कर्नाटकातील शिमोगा हा जिल्हाही त्यात समाविष्ट होता. बसवभूपालाने आपला पुत्र सोमशेखर ह्याच्या प्रश्नांना अुत्तरे देण्यासाठी प्रस्तुत ग्रंथ रचला आहे. ग्रंथाचे स्वरूप प्रायः संकलनात्मक आहे. अनेक स्मृती, शैवग्रंथ, राज्यशास्त्र, संगीतशास्त्र, वैद्यकशास्त्र, पाकशास्त्र, कामशास्त्र, अित्यादी विषयांवरील विविध ग्रंथातून माहिती संकलित केली आहे. पण ही माहिती मांडताना बसवभूपालाने आपल्या राजवंशाचा संस्थापक चौडप्प ह्यापासून प्रारंभ करून आपले आअीवडिल सोमशेखर व चैंबा ह्यापर्यंतची अनेक प्रकारची माहिती सांगून त्यायोगे आपल्या वंशाचा अितिहासही दिला आहे. हा वंश अि. स. १५०० ते १७६३ पर्यंत राज्य करीत होता. बसवभूपालाने शिवतत्वरत्नाकराशिवाय आणखी सुभाषितसुरद्रुम ह्या

---

* दि. १८ व १९ ऑक्टो. १९७३ रोजी भारत इतिहास संशोधक मंडळातर्फे इचलकरंजीकर स्मारक व्याख्यानांसाठी तयार केलेला हा निबंध मंडळाच्या कार्यवाहांच्या संमतीने धन्यवादपूर्वक प्रकाशित करण्यात येत आहे. — लेखक

संस्कृत आणि सूक्तिसुधाकर ह्या संस्कृत व कन्नड मिश्र असलेल्या ग्रंथाचीही रचना केली आहे. आपल्या ग्रंथाच्या प्रारंभी आपल्याला गौरीनाथाच्या कृपेमुळे सर्व कलेत प्रावीण्य आणि पांडित्य मिळाले असून सर्व वाङ्मयाचे अनेकवार परिशीलन करून हा ग्रंथ आपण लिहिला असल्याचे लेखकाने जाहीर केले आहे. ( लोकांना तु हिताय सारकेलदीसिंहासनाधीश्वरो गौरीनाथकृपार्जिताखिल कलापाण्डित्यविभ्राजितः । कुर्वेहं बसवेन्द्रभूमिरमणो रत्नाकराख्यां कृतिं सर्वं प्रेक्ष्य च वाक्प्रपञ्चमसकृत् पुत्र त्वमाकर्णय ॥ १.१. १८. तुलना करा– विद्याः समस्ताः समवेक्ष्य भूयः संगृह्य चार्थानिह पद्यरूपैः । वचोनिगुम्फैः शिवतत्त्वरत्नाकराभिधानां कृतिमातनोति ॥ १.१.२४ )

## शिवतत्त्वरत्नाकरातील विषय आणि त्यांचे आधारग्रंथ

शिवतत्त्वरत्नाकरात असंख्य विषय आले असून ते विविध ग्रंथातून घेतले आहेत. प्रत्येक कल्लोलाच्या शेवटी त्या त्या कल्लोलातील विषय कोणत्या ग्रंथातून घेतले आहेत ते आधारग्रंथ दिले आहेत. सृष्ट्युत्पत्तिविषयक विचार, विश्वरचना, भूगोल, वर्णाश्रमधर्म हे विषय वेद, आगम, पुराणे, स्मृति ह्या प्रकारच्या ग्रंथातून घेतले आहेत. राज्यशास्त्र कामंदकीयनीतिसारातून, गणितशास्त्रनिधिप्रदीपिका, ज्योतिषार्णव ह्या ग्रथातून घेतले आहे. संगीतशास्त्र दत्तिलग्रंथातून, नाट्यशास्त्र भरतनाट्यशास्त्रामधून, कामशास्त्र वात्स्यायनाच्या ग्रंथातून, रत्नशास्त्र शुक्र आणि बृहस्पतींच्या ग्रंथातून, आयुर्वेद धन्वन्तरी आणि आश्विना, वाग्भट ह्याकडून, वास्तुशास्त्र विश्वकर्म्याकडून, सामुद्रिकशास्त्र सामुद्रतिलक ग्रंथातून, अश्वशास्त्र, शालिहोत्राकडून, गजशास्त्र पालकाप्याकडून अशा प्रकारे विविध विषय ग्रंथकर्त्याच्या विविध ग्रंथातून घेतले गेले आहेत.

शिवतत्त्वरत्नाकर हा विविध विषयांनी भरलेला मोठा ग्रंथ असला तरी त्याचे खरे महत्त्व धर्मेतिहासाच्या दृष्टिकोणातून त्याचा अभ्यास केला असताच कळणार आहे. विविध प्रकारच्या चालीरीती, अंधविश्वास, देवतांची पूजा, होम, हवन, ब्राह्मणांना दिल्या जाणाऱ्या दक्षिणा, वर्तनासंबंधीचे भावात्मक आणि निषेधात्मक नियम इत्यादींची शिवतत्त्वरत्नाकरात रेलचेल दिसून येते. अशा प्रकारे धर्माची विविध अंगे शिवतत्त्वरत्नाकरात प्रतिबिंबित झालेली आढळतात. शिवतत्त्वरत्नाकरात अनेक तथाकथित शास्त्रे आली असली तरी ती शास्त्रे म्हणून आलेली नसून ती धर्माचा एक भाग ह्या दृष्टीने आलेली आहेत. ह्या दृष्टीनेच शिवतत्त्वरत्नाकराचा एक आढावा घेण्याचा प्रयत्न प्रस्तुत दोन व्याख्यानांमध्ये करण्याचे ठरविले आहे.

ज्या ज्ञानाचा संग्रह शिवतत्वरत्नाकर ह्या धार्मिक ज्ञानकोशात केला जाणार आहे ते कोठून घेतले आहे हे सांगण्यासाठी शिवतत्वरत्नाकरात प्रथम अठरा महाविद्या. उपनिषदे, वेदांगे, उपांगे, स्मृती, उपस्मृती, पुराणे, उपपुराणे, आगम ह्यांच्या याद्या दिल्या आहेत. (१.१.२७–९५). हे सर्व ग्रंथ धार्मिक आहेत. मग जगदुत्पत्तीचा शैव मतानुसार विचार करता सर्व नाम-प्रपंचाचे आदिकारण शिव हाच आहे असे म्हटले आहे ( १.३.१ ). ब्रह्म हे अखंड, पूर्ण, नित्य, चित्-प्रकाश असे असून (१.३.२२–२३) ते आदिभक्त आहे. त्यापासून सनिरंजनजंगम निर्माण झाला. त्याच्या शिखेपासून शून्यलिंग हे विश्वाचे आदिकारण निर्माण झाले. त्यापासून निष्कललिंग, निष्कल लिंगापासून महालिंग, महालिंगापासून प्रणवलिंग, प्रणवलिंगापासून शिवतत्व त्यापासून महेश्वर, महेश्वरापासून रुद्र, रुद्रापासून जनार्दन, जनार्दनापासून पितामह आणि पितामहापासून चराचर जग निर्माण झाले (१.३.४–९).

सर्वभूते रुद्रापासून जन्मून त्यातच विलीन होतात. ( ७.३.३७ ). जे सर्वोत्कृष्ट असते त्याला उद्देशून "महत्" हा शब्द लावला जातो. रुद्र हा सर्व देवात ज्येष्ठ असल्यामुळे त्याला महादेव म्हणतात ( ४२ ). तो शिवलोकात राहून सर्व जाणतो (५० ).

## विश्वरचना

प्रत्येक लोकात एकेक शिवलिंग असून त्यांची क्रमाने नावे शिव, शंभु, शंकर, शितिकंठ, उमापती, सर्वेश्वर, नीलकण्ठ अशी आहेत. (२.४.५४). सातही लोकातील प्राणिमात्र आपापल्या लोकातील लिंगाच्या पूजनाने आणि त्या त्या लिंगाच्या प्रसादाने स्वतःची इच्छा पूर्ण करून घेतात ( ५५ ). जंबूक, शाक, कुश, क्रौंच, शाल्मलि, गोमेद, पुष्कर अशी सात बेटे आहेत (२.५.११). जम्बुद्वीपाभोवती क्षारार्णव आहे. त्याभोवती शाकद्वीप. त्याभोवती कुशद्वीप, त्याभोवती दधिसागर, त्याभोवती क्रौंचद्वीप, त्याभोवती घृतसागर, त्याभोवती शाल्मलिद्वीप, त्याभोवती इक्षुरससागर, त्याभोवती गोमेदद्वीप, त्याभोवती सुरासागर, त्याभोवती पुष्करद्वीप व त्याभोवती गोड पाण्याचा सागर आहे ( १२–१९ ). भारत, किंपुरुष, हरिवर्ष, रम्यक, उत्तर, हिरण्मय, उत्तरकुरु अशी सात वर्षे आहेत ( २. ७. ६–७ ). भारत हे नाव भरत ह्या मुनीवरून पडले असून स्वर्ग आणि मोक्ष येथूनच मिळतात ( ४. १. ८–९ ).

पृथ्वीपासून सूर्य एकलक्षयोजने दूर आहे ( ३. ३. २८ ). सूर्य मंडलापासून चंद्र एकलक्ष योजनांवर आहे ( ३. ४. ५७ ), ह्यानंतर नक्षत्रमंडल,

बुधमंडल, मग शुक्र, मंगळ, बृहस्पती, शनैश्चर आणि राहू ह्यांची मंडले आहेत (८२ व पुढे). ब्रह्मदेवाच्या वरामुळे सर्पाकार, अंधकारमय असा राहू चंद्र-सूर्यांना आच्छादतो (३.४. १००–१०१).

पावसाबद्दल पुढील प्रकारचे ठोकताळे दिले आहेत. कार्तिक, मार्गशीर्ष ह्या महिन्यातील संक्रातीला पाऊस पडल्यास धान्य मध्यम येते (३. २. ३) दिवाळीच्या वेळेस ढग थोडे पांढरे, थोडे पिवळे असल्यास काही ठिकाणी पाऊस आणि काही ठिकाणी अवर्षण पडते. श्रावणात शुक्ल सप्तमीला स्वाती नक्षत्र असेल तर पाऊस चांगला पडतो. वर्षात पहिल्या प्रथम चमकलेली वीज पूर्व दिशेला असेल तर पाऊस चांगला पडतो, पण पश्चिमेला असल्यास पाऊस पडत नाही. (४९–५०).

## वर्णाश्रमधर्म

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण असून त्यात ब्राह्मण श्रेष्ठ आहे (४.४.४). ब्राह्मणाने अध्यापन, अध्ययन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह ही कर्मे करावीत. क्षत्रियाने प्रजारक्षण, दान, यज्ञ, अध्ययन, युद्ध, शत्रूचा वध, दुष्ट पक्ष्यांचा व पशूंचा नाश करावा, दुष्ट माणसांना शासन करावे. वैश्याने पशुरक्षण, दान, यज्ञ, अध्ययन, वाणिज्य, सावकारी, शेती करावी (५–९). शेतीसाठी बैल, धान्य, पाऊस व चांगली भूमी ह्या चार गोष्टी असल्या पाहिजेत (२२–२३). शूद्राने द्विज, गायी, देव ह्यांची निष्कपटपणे सेवा करावी. मिळेल त्यात संतोष मानावा (२४). व्रती, गृही, गृही भिक्षु असे चार आश्रम आहेत (२५). ब्राह्मणाचा आठव्या, क्षत्रियाचा अकरा, वैश्याचा बारा वर्षापर्यंत उपनयनसंस्कार व्हावा. फार तर अनुक्रमे सोळा, बावीस आणि चोवीस वर्षापर्यंत झाला तरी चालेल. (२६–२९). ह्यानंतर मात्र तो सावित्रीपतित होईल. सावित्रीपतितांशी बोलू नये (३०). अशांनी चांद्रायण, कृच्छ्र ह्यांसारखी व्रते बारा वर्षेपर्यंत करावी (३१). ब्राह्मणाचे यज्ञोपवीत कापसाचे, क्षत्रियाचे शणसूत्राचे व वैश्याचे लोकरीचे असावे (३२). उपनयनानंतर गुरुगृही रहावे. त्यावेळी गुरूची सेवा करावी व वेदग्रहण करावे (३८). सकाळ–संध्याकाळ अग्निकार्य, ब्रह्मयज्ञ, तर्पण करावे (४१) भिक्षान्न खावे (४३). मद्य, मांस, स्त्री, लवण, तांबूल, दन्तधावन, उच्छिष्ट भोजन, दिवसा झोप ह्या गोष्टी टाळाव्यात. तसेच छत्री, पादुका, गंध, माल्यानुलेपन हेही वर्ज्य ठेवावे (४७–४८). अष्टका, चतुर्दशी, प्रतिपदा, पर्वदिन, श्रावणद्वादशी, श्रोत्रिय घरी आल्यास, सूर्याला खळे पडल्यास,

संधिकालात, मेघगर्जना, कलह, उल्का, अशनि पडल्यास, अकाली पाऊस पडल्यास, अनध्याय समजावा. (४९–५२). सुट्टीच्या दिवशी अध्ययन केल्यास प्रजा, प्रज्ञा, यश, आयुष्य, श्री, बल, आरोग्य ह्यांचा नाश यम करतो. (५८) वेदाध्ययनानंतर गुरुदक्षिणा दिल्यावर गुरूंच्या परवानगीने गृहस्थाश्रम स्वीकारावा (४.५.१–२). जिच्याशी विवाह करावयाचा ती कन्या रूपयुक्त, सुकुलीन, धार्मिक, सुशील, निरोगी आणि भाळू असलेली असावी (४–५). रडणारी, जांभया देणारी, रोगी, कमी अधिक अवयव असलेली, खालचा ओठ लोंबत असलेली, जेवताना हसणारी, रडणारी, श्मश्रू असलेली, बाओट दातांची, कठोर बोलणारी, चालताना जमीन हदरवून टाकणारी, हसताना गालावर खळी पडणारी नसावी (७–१०). विवाहाच्या आठ प्रकारांपैकी (१२–२३) ब्राह्म, दैव, आर्ष हे ब्राह्मणांसाठी, राक्षस हा क्षत्रियांसाठीच आणि वैश्य शूद्रांसाठी आसूर हा विवाह चांगला ( २५ ). विवाहानंतर गृहधर्म पाळावेत. देव, भूत, पितृ, मनुष्य ह्यांना उद्देशून यज्ञ करावेत (२७–२८). श्राद्धे करावीत (३६). वानप्रस्थाश्रमात प्रवेश करताना, मुलांच्या स्वाधीन पत्नीला करवून किंवा तिच्यासह वनात जावे. नखे, श्मश्रू, धारण करावीत, जमिनीवर झोपावे, फळे, मुळे खावीत स्वाध्यायनिरत रहावे ( ४७–५२ ). संन्यासाश्रमामध्ये मनात वैराग्य निर्माण. होईल तेव्हा प्रवेश करून वेदांताभ्यास करावा. शम–दम–युक्त व्हावे. नग्न रहावे किंवा जीर्णकौपीन धारण करावे. मुंडन करावे. ग्रामात अेक रात्रच व शहरात तीन रात्रीच रहावे. भिक्षा मागावी, प्रणवाचा जप करावा. शंकराचे ध्यान करावे. म्हणजे मनुष्य मोक्षाला जातो ( ५४–६३ ).

## वर्तनाचे सामान्य नियम

अन्नग्रहण करताना मौन पाळावे. तोंडाने फुंकून खाणारा मद्यपी ठरतो. नुसते मीठ खाणारा गोमांसभक्षक ठरतो. म्हणून ह्या गोष्टी टाळाव्यात. पेय पिताना आवाज करू नये नाहीतर नरक प्राप्त होईल. भोजनानंतर बारा चुळा भराव्यात (४.६.२५) व तांबूल भक्षण करावे (३६-३७). परान्न, परनिंदा वर्ज्य करावी. पायावर पाय ठेवून बसू नये. शेंडी मोकळी सोडू नये. मद्य, द्यूत, गायन ह्यात द्विजाने रस घेऊ नये. डोक्याला लावून उरलेले तेल अंगाला लावू नये. ब्राह्मणांची निंदा करू नये ( ३८–५५ ). थोरांना वंदन करावे ( ५६–५८ ). ब्राह्मणाने क्षत्रियादींना नमस्कार करु नये. नास्तिक, चोर, कृतघ्न, व्रात्य, ज्योतिषी, उन्मत्त, पळणारा, अपवित्र, आंघोळ करीत असलेला, जेवणारा, ओकणारा, झोपणारा ह्यांना नमस्कार करू नये. नमस्कार केल्यानंतर जो

प्रतिनमस्कार करीत नाही त्याला पुनः कधी नमस्कार करू नये. तो शूद्र समजावा ( ५९–६६ ). पुढील कर्मे केल्याने पूर्वीचे पुण्य नष्ट होते. धोबीघाटा-वर स्नान, गणिकेच्या घरी भोजन, न्हाव्याच्या घरी हजामत, दोन ब्राह्मणांच्या मधून, गुरुशिष्यामधून, नंदी आणि शंकर ह्यांच्यामधून जाणे इत्यादी (६८–७०).

कर्मविपाक :

चांगल्या वाईट कर्माचे चांगले वाईट फळ मिळते. वाईट कर्माच्या फलांचे विस्तृत वर्णन आढळते. त्यातील प्रमुख म्हणजे नरकप्राप्ती. नरकाचे अनेक प्रकार आहेत. त्यांची नावेच बोलकी आहेत. रौरव म्हणजे जेथे लोक रडतात, ओरडतात (२. २. १२), महातमः ( मोठा अंधार १४ ), सुप्रपीडन (१५), संकट (२३), मलपर्वत (२६), अित्यादी. नरकात पापी लोकांना अनेक प्रकारच्या कठोर शिक्षा दिल्या जातात. त्यांना तापलेल्या बेड्यांनी बांधून ठेवण्यात येते, यमदूत मारतात, स्वतःची कर्मे कबूल करावी लागतात, विष्ठापूर्ण कूपात टाकले जाते. (३३–४०). जे गुरुनिंदा अैकतात त्यांचे कानात तापलेले लोखंडी खिळे ठोकण्यात येतात (४६). जे परस्त्रीकडे, गुरुपत्नीकडे लुब्ध नजरेने पाहतात त्यांच्या डोळ्यात सुया खुपसण्यात येतात (४९–५०). परस्त्रीला स्पर्श करणाऱ्या माणसाला तापलेल्या लोखंडी स्त्री-प्रतिमेस आलिंगन देण्यास लावतात (५५). क्रोधी लोकांना खारट पाण्याने कठिण शिलांवर अुगाळण्यात येते (६४–६६). शंकराच्या बागेतील फुलांचा जे वास घेतात त्यांच्या डोळ्यात तापलेले लोखंडी खिळे खुपसण्यात येतात ( ७१ –७२ ). असल्या शिक्षांच्या तपशीलवार वर्णनात मध्ययुगीन भारतीयांची कल्पनारम्य सॅडिस्टिक ( परपीडारत ) वृत्ती दिसून येते. पुढे असे म्हटले आहे की अशा यातना भोगूनही ते पापी त्यांचे पाप कमी झाल्याशिवाय मरत नाहीत म्हणून माणसाने कधी पाप करू नये. असे क्लेश भोगल्यावर पुनः त्या पापी लोकांना तृणाचा जन्म येतो, मग ते कीट, पक्षी, पशु, ह्या क्रमाने मानवयोनीत जन्मतात (१०२–१०७). पण मानवी शरीरातही त्यांच्या ठिकाणी रोगांच्या व व्यंगांच्या रूपाने पापाची खूण दिसतेच. पूर्वजन्मीचे पापच व्याधिरूपाने जन्मते. ब्रह्महत्या करणारा क्षयी होतो. दारू पिणाऱ्याचे दात काळे होतात. सोन्याची चोरी करणारा वाओीट नखांचा होतो, राजहत्या करणाऱ्याला राजयक्ष्मा होतो. अपवित्रपणे सूर्यदर्शन करणारा रातांधळा होतो, स्नान न करणाऱ्याला डोकेदुखी होते. श्वेतवस्त्र, रुपे ह्यांच्या चोरीमुळे श्वेतकुष्ट होते.

हत्ती मारल्यास गजकर्ण होते. बालहत्या करणाऱ्याची मुले मरतात. ह्या गुन्हे आणि शिक्षा ह्यामध्ये अेक प्रकारचा सादृश्यमूलक यात्वात्मक कार्या-कारणभाव आहे हे स्पष्टपणे दिसेल. शिवाची निंदा करणारा कोटिजन्म डुक्कर होऊन सात जन्म कुष्ठी होतो व शेवटी दासीपुत्र होतो (३–५३). पापे दूर करण्यासाठी प्रायश्चित्तादी उपाय आहेत. उदाहरणार्थ ब्रह्महत्येचे पाप घडले असता संन्यास घ्यावा; वनात रहावे. बारा वर्षे हे व्रत करावे पण व्रतकालातच शक्यतो गाय, किंवा द्विज ह्यासाठी प्राणत्याग करावा. (८. ७. ३.). सुरापान हे अेक महापातक आहे. पण औषध म्हणून मद्यपान केल्यास पुन: उपनयन करावे (२८). परंतु सर्व पापांची सर्वश्रेष्ठ प्रतिक्रिया अेकच म्हणजे "शिव" हे मंगल नाम उच्चारणे. त्यामुळे सात जन्मात केलेले पाप दूर होते. पाप आणि पुण्य ह्यांच्याविषयी कोटी ग्रंथांनी जे सांगितले आहे ते एका श्लोकार्धात सांगावयाचे झाले तर असे म्हणता येईल. परोपकार म्हणजे पुण्य व परपीडा म्हणजे पाप ( श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रन्थकोटिभिः । परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥ ( २.३.५७ ).

## कलिधर्म

कलियुगात धर्माची स्थिती किती वाईट असते आणि एकूण समाजाचा कसा अधःपात होतो ते शिवतत्वरत्नाकराच्या चौथ्या कल्लोलाच्या दहाव्या तरंगात सांगितले आहे. कलियुगात धर्म फक्त एक चतुर्थांश शिल्लक उरतो (५). हे तमोयुग ( अंधाराचे, काळे युग ) आल्यावर हरि ( पिवळा ) हाही कृष्ण ( काळा ) बनतो (५). जो कोणी धर्मात्मा कर्मकांडात रत राहील त्याचा लोक तिरस्कार करतात. (६). व्रताचरण नष्ट होते, ध्यान, यज्ञ इत्यादि विधी बंद होतात. (७). सर्वजण मत्सरी बनतात, दांभिक आचरणात मग्न राह-तात. अल्पायुषी ठरतात (८). ब्राह्मण वेदाध्ययनाकडे पाठ फिरवितात, खोट्या धर्मात गढून जातात, व्यर्थ अहंकाराने दूषित होतात (११). सर्वजण स्वतःला पंडित समजून प्रत्येक गोष्टीला विरोध करतात (१२). दया, दाक्षिण्य हे गुण शिल्लक राहात नाहीत. सगळेजण शूद्रतुल्य होतात (१७). राजे लोभी बनातत. जो कोणी घोडे, रथ ह्याबाबत समृद्ध असेल तो राजा बनतो (१८–१९). ब्राह्मण शूद्रांचे नोकर बनतात (२०). ब्राह्मण सज्जन आणि विधवा ह्यांचे धन लुबाड-तात (२६). लोक फक्त दुधाच्या हेतूनेच गायींची निगा राखतात (३५). शूद्र ब्राह्मणसेवा करीत नाहीत (३६). ते लाच खाऊन जगू लागतात (३८). गायींचे दूध कमी होते. दुधातून तूप निघत नाही. ( ६२ ). वित्त हेच गुण

अनुक्रमणिका

ठरवते (६८). बलच धर्म, न्याय ह्यांचा निर्णय देते (६९). यज्ञोपवीतच ब्राह्मणत्व ठरवते (७०). वेगाने बोलेल तो पंडित ठरतो, स्वीकार म्हणजेच विवाह ठरतो, स्नान म्हणजेच स्वच्छता ठरते (७१). अशा प्रकारे कलियुगात सर्व प्रकारची अवनती होते. परंतु जे शिवाची पूजा करण्यात तत्पर असतात, शिवनाम घेण्यात मग्न राहतात, ते शिवतुल्यच होतात आणि त्यांना कलीची बाधा होत नाही (७५) असा दिलासा दिला आहे.

उत्पात व त्यांची फले

कलिदोषामुळेच वेगवेगळे उत्पात घडून येतात (४.११.१) आणि त्यापासूनच वेगवेगळी संकटे सूचित होतात. पांढरा कावळा दिसला तर राजा मरतो किंवा तो देश नष्ट होतो (४–५). ज्या घरात घुबड ओरडते त्या घरातील प्रमुख व्यक्तीचा मृत्यू घडतो. (५–६) प्रासाद, तोरण, द्वारे, इत्यादी अचानक पडली तर राजाचे मरण सूचित होते (६–७). ऋतूंची आलटापालट होणे, वाद्यांवर आघात केला तरी ती न वाजणे, अरण्यातील पशुपक्षी गावात शिरणे आणि गावातील अरण्यात जाणे, जलचर प्राणी जमिनीवर येणे, कोल्हा ओरडणे, संध्याकाळी कोंबडा आरवणे, इत्यादी सर्व उत्पातांनी मृत्यू सुचवला जातो (८–१६). त्याचप्रमाणे उल्का पडणे, गारा पडणे, भूकंप होणे, इत्यादीही उत्पात अशुभ असतात. (२२–२४). देवता रडतात, हसतात, त्यांना घाम फुटतो, उभ्या राहतात जळतात, तोंड खाली करतात त्यांच्या तोंडातून धूर येतो ह्यासारखे उत्पातही अशुभसूचक आहेत (४२–४५). अशा प्रकारचे उत्पात झाल्यावर त्यांची शांती केली नाही तर जरी ते उत्पात शमले तरी त्यांचे अशुभ फळ तीन वर्षांनी का होईना मिळाल्याशिवाय राहात नाही (२७). म्हणून उत्पातांची शांती लवकरात लवकर करावी. त्यावेळी देवतांची स्नान, धूप, गंध, माल्य ह्यांनी पूजा करावी, सात दिवस होम करावा. मधुर अन्नपान, दक्षिणा ह्यांनी सात दिवस ब्राह्मणांची पूजा करावी आठव्या दिवशी भूमि, गायी, सोने त्यांना द्यावे (५०–५२). झाडे रडू हसू लागली तरीसुद्धा शांतिकर्म करावे. (६०–७३). स्त्रियांना अकाली प्रसूती झाली किंवा काल उलटून गेल्यावर प्रसूती झाली, तसेच त्यांना जर पशु, पक्षी, साप अशा प्रकारची अमानुषी प्रजा झाली तर तीही उत्पात समजावा. त्यायोगे देशाचा नाश सूचित होतो. अशा स्त्रियांना राजाने स्वतःच्या राष्ट्रातून हाकलून द्यावे. नंतर ब्राह्मणांना भोजन द्यावे. त्यायोगे शांती होते (८७–८९). अशा प्रकारे अनैसर्गिक चमत्कारिक घटनांचे शास्त्रीय ज्ञान उपलब्ध नसल्यामुळे त्यांच्याविषयी भीती वाटून त्यांच्या शांतीसाठी धार्मिक विधी केले जाणे स्वाभाविक आहे.

## स्वप्ने

स्वप्नांनासुद्धा सूचक अर्थ मानला गेला आहे. त्यांना चांगली वाईट फळे सूचित करण्याचे सामर्थ्य आहे. रात्रीच्या पूर्वभागात पडलेल्या स्वप्नांचे फळ उशीरा मिळते, अरुणोदयाच्या वेळी पडलेल्या स्वप्नांचे बारा दिवसांनी मिळते. गायींची धार काढण्याच्या वेळेस पडलेल्या स्वप्नांचे फळ तीन रात्रीत मिळते. गायी चरावयास सोडण्याच्या वेळी पडलेल्या स्वप्नांचे फळ त्याच दिवशी मिळते. (५.३.६–७). स्वप्नांचे वातज, पित्तज आणि कफज असे तीन प्रकार आहेत. आपण आकाशातून उडत चाललो आहोत असे दिसणे हे वातज स्वप्न. सुवर्ण, सूर्य, दिवा, दावाग्नी इत्यादी दिसणे हे पित्तज स्वप्न आणि समुद्र, नदी, सरोवरे, मोती, हंस, शुभ्र कमळे, नक्षत्रे इत्यादी दिसणे, हे कफज (१०–१२). हे विभाजन शास्त्रीय असण्यापेक्षा रंगावर आधारलेल्या सादृश्यमूलक धातूवर आधारलेले दिसते. स्वप्नांच्या सूचकतेविषयी एक नियम असा सांगितला आहे की रोगी, शोकाकुल, चिंताग्रस्त, कामार्त आणि अतिधूर्त ह्यांना पडलेली स्वप्ने खरी होत नाहीत (१४). अहेतुकपणे पडलेली सर्व स्वप्ने खरी ठरतात (१४). स्वप्नात राजा, हत्ती, घोडा, सोने, गाय बैल हे दिसल्यास कुटुंबाची भरभराट होते (१६). स्वप्नात प्रासादावर, डोंगरावर, झाडावर चढत आहोत असे दिसणे, विष्ठेचा लेप, रडणे, मृत्यु दिसल्यास शुभफल मिळते (१७). स्वप्नात तेजस्वी सूर्यमंडल किंवा चंद्रमंडल दिसले तर रोगमुक्ती होते (१९). स्वप्नात आपण समुद्र पिताना दिसल्यास राज्यप्राप्ती होते (२३–२४). स्वप्नात सुरापानाचेही शुभ फल मिळते (२७–२८). स्वप्नात कुत्रा, कोल्हा, गिधाड दिसल्यास शोकप्राप्ती होते (५७). कावळा, ससाणा, पिशाच, राक्षस दिसल्यास संकट प्राप्त होते ( ६० ). स्वप्नात तांबडी वस्त्रे धारण करणाऱ्या, रक्तगंध लावलेल्या स्त्रीने आलिंगन दिल्यास त्या माणसाची ती शेवटचीच रात्र समजावी म्हणजे तो त्याच दिवशी मरतो (६२). स्वप्नात आपण मधाने, तुपाने, तेलाने, आपण माखले गेलो आहोत असे दिसले तर रोगप्राप्ती (६६). स्वप्नात तारका किंवा नक्षत्र पडताना दिसल्यास मरण येणे (६९). स्वप्नांच्या सूचकतेविषयी असे म्हणता येईल की काही गोष्टी उदाहरणार्थ कोल्हा, गिधाड इत्यादी प्रत्यक्षात आणि स्वप्नात दोन्हीतही अशुभ आहेत. काही गोष्टी उदाहरणार्थ, विष्ठा प्रत्यक्षात अशुभ तर स्वप्नात शुभ. तसेच काही गोष्टी उदाहरणार्थ मध, तूप प्रत्यक्षात चांगल्या तर स्वप्नात वाईट. सुवर्ण, गाय, हत्ती ह्यासारख्या गोष्टी प्रत्यक्षात आणि स्वप्नात दोन्हीमध्ये शुभ आहेत. स्वप्नविषयक

लोकभ्रम हे पूर्णपणे यात्वाभास आहेत. त्याचा आरोग्यशास्त्राशी काही संबंध नाही.

शकुन–

इतरही भावि फलसूचक शकुन शिवतत्त्वरत्नाकरात वर्णिले आहेत. शुभाशुभ फले किंवा जवळ आलेल्या, पुढे होणाऱ्या गोष्टींची सूचना शकुनांमुळे मिळते असे म्हटले गेले आहे ( ५.८.३–४ ). बाहेर जाण्याच्या वेळी पाठीमागून वारा वाहत असणे, तो सुगंधी, शीतल, मृदू असणे ह्यावरून कार्य सिद्धीस जाईल असे सूचित होते ( ५–६ ). जाताना कुत्रा दिसला तर त्याच्या वर्णावरून शुभाशुभ किंवा अशुभ शकुन ठरवावा. पांढरा, तांबडा, पिवळा, काळा व रंगीबेरंगी ह्या रंगाचे कुत्रे अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व संकरज समजावेत. जाताना ब्राह्मण कुत्रा डाव्या बाजूने गेल्यास कार्यसिद्धी उशीरा होते. (३१). वैश्य कुत्रा डाव्या बाजूने गेल्यास त्याच दिवशी सिद्धी होते (३२). शूद्र कुत्रा डाव्या बाजूने गेल्यास विनाविघ्न कार्यसिद्धी होईल (३३). शिवारूत म्हणजे कोल्हेकुई ( शिवा म्हणजे कोल्ही ) ह्यावरूनही शुभाशुभ फल सूचित होते. रात्री दक्षिणेला कोल्ही ओरडल्यास ते अतीव सौख्यदायक असते. पश्चिमेला ओरडल्यास परचक्रभय असते. उत्तरेला शुभ ( ४४–४५ ). कोल्हीने फे फे आवाज केल्यास नगरनाश होतो. हू हू केल्यास सर्वशुभ, भू भू केल्यास संकट येते. हा बु हा बु केल्यास महाभय येते. ह ह केल्यास राजास मृत्यू येतो ( ५०–५१ ). कावळ्याच्या ओरडण्यावरूनही असेच शकुन पाहता येतात. वडाच्या झाडावर बसून जर कावळा ओरडला तर इष्ट भोजनपान मिळते (५३). त्याने क्वां क्वां असा आवाज काढला तर क्षेम, कीं कीं असा काढला तर इष्ट भोजनपान, कुं कुं असा काढला तर धनप्राप्ती, क्वे क्वे असा काढला तर सुवर्णप्राप्ती होते (५६). कावळ्याचा आवाज ऐकू आल्यावर आपल्या पायांनी स्वतःची सावली मोजावी व ती जितकी पावले येईल त्यात तेरा मिळवून सहाने भागावे. एक उरला तर रोग, दोन उरले तर लोभ, तीन उरले तर प्रवास, चार उरले तर भोजन, पाच उरले तर धनागम, आणि शून्य उरले तर मरण असे शकुन समजावेत हे पराशराचे मत आहे (६१). कावळा डोक्यावर बसला तर मरण प्राप्त होईल (६०). बाहेर जाताना प्रसन्न सुशील ब्राह्मण वेश्या, कन्या, तांदूळ, पुष्प, फल, गाय, बैल, चंदन, समिधा, दूर्वा, तूप, प्रेत, वाद्य, आरसा, पूर्णकुम्भ, चक्रवाक, हत्ती, रत्ने, सोने ही दिसणे हा शुभशकुन आहे ( ९८–१०३ ). परंतु हिजडा, मुका, बहिरा, वेडे वाकडे शरीर असलेला,

ब्राह्मणद्वेष्टा, संन्यासी, कोळी, रोगी, विधवा, वंध्या, भिक्षुणी, तेल, मध, ओकारी, लोखंड, मांजर, दोरी, कोण्डा, केस, सूप, घुबड, रेडा, माकड, गाढव, रिकामी भांडी दिसणे हा अशुभ शकुन होय ( १०४ – ११२ ).

## ज्योतिःशास्त्र व सामुद्रिकशास्त्र

शिवतत्त्वरत्नाकरात ज्योतिःशास्त्र आणि सामुद्रिकशास्त्र ही दोन शास्त्रे समाविष्ट केली गेली आहेत. त्यांचाही संबंध जे प्रत्यक्ष जाणता येत नाही त्याचे काही गूढ मार्गांनी व ठोकताळ्यांनी ज्ञान करून घेण्याशी आहे. ग्रहाविषयी व कुंडलीतील त्यांच्या स्थानावरून फले सांगताना शनि, गुरु मंगळ हे ग्रह आपल्या स्थानापासून सप्तम स्थानावर पाहतात असे म्हटले आहे (७.८.४). सर्व त्रिकोणाधिपती शुभफल देणारे समजावेत (५). अष्टमस्थानावरून आयुष्य पहावे ( २२ ). व्ययस्थानाधिपतीच्या दशेत निधन घडते ( २५ ). तसेच पापग्रहांच्या दशेतही मृत्यू येतो ( २७ ). शनि मारक ग्रहांच्या संबंधात आला की तो निधन घडवतो ( २८ ). मेष लग्नाला शनि, बुध, शुक्र हे ग्रह अशुभ असतात आणि गुरु रवि हे शुभ असतात. वृषभ लग्नाला गुरु, शुक्र, चंद्र हे अशुभ तर शनि, रवि हे शुभ. एकटा शनि वृषभ लग्नाला राजयोग घडवू शकतो. मिथुन लग्नाला मंगळ, गुरु, रवि हे ग्रह अशुभ असतात आणि शुक्र शुभ असतो. कर्क लग्नाला शुक्र, बुध हे अशुभ आणि मंगळ, गुरु हे शुभ. सिंह लग्नाला बुध, शुक्र अशुभ आणि मंगळ शुभ. कन्या लग्नाला मंगळ, गुरु, चंद्र अशुभ, तर शुक्र शुभ. तूळ लग्नाला गुरु, रवि, मंगळ अशुभ आणि शनि बुध शुभ. वृश्चिक लग्नाला चंद्र, मंगळ, शुक्र अशुभ, चंद्र शुभ, धनु लग्नाला शुक्र अशुभ, मंगळ रवि शुभ. मकर लग्नाला मंगळ, गुरु, चंद्र अशुभ, शुक्र, बुध शुभ. कुंभ लग्नाला गुरु, शुक्र, मंगळ अशुभ, शुक्र शुभ. मीन लग्नाला शनि, शुक्र, रवि, बुध अशुभ, मंगळ, चंद्र शुभ ( ४१–६४ ). राजयोगाचा प्रारंभ मारकग्रहांच्या दशेत होतो ( ३२ ). केन्द्र व त्रिकोण ह्यांच्या अधिपतींचा संयोग झाला तर तो राजयोगकारक ठरतो. (१७). लग्नेश सहा, आठ, बारा ह्या स्थानात असेल तर देहसुख मिळत नाही (८६). चतुर्थेश लग्नात किंवा लग्नेश चतुर्थात असला तर गृहलाभ होतो (९१). लग्नेश सूर्याशी संबद्ध असेल तर मनुष्य जात्यंध असतो. चंद्राशी संबद्ध असेल तर रातांधळेपण येते ( ९२ ). स्त्रीविषयक फलज्योतिष सांगतांना असे म्हटले गेले आहे की सप्तम किंवा नवम स्थानात बुध, एकादशात मंगळ, असल्यास धन, पुत्र, पौत्र संपत्ती स्त्रियांना मिळते (११२). तसेच एखाद्या

मुलीच्या कुंडलीत पंचम किंवा नवमस्थानात बुध असून व्ययात शुक्र असेल तर ती राणी होईल. ( १२० – १२१ ). अशाच प्रकारे स्त्रियांबाबत सामुद्रिक आडाखे पुढीलप्रमाणे दिले आहेत. एखाद्या मुलीच्या पायावर चक्र, स्वस्तिक शंख, कमळ, ध्वज, मीन, छत्री अशी चिन्हे असतील तर ती राणी होईल. पण तिच्या पायावर सर्पाकार रेषा असतील तर दुःख, दारिद्र्य तिला लाभेल (१६). जी स्त्री चालताना धूळ उडवत चालते ती कुलनाशक ठरते (२१).

अशाच प्रकारे पुरुषांचीही सामुद्रिक फले सांगितली गेली आहेत. राजाच्या पायाचे तळवे मऊ, घाम न येणारे असतात, पाय कासवाप्रमाणे उंच असतात. सुपाप्रमाणे किंवा वाकडेतिकडे असणारे, शिरा दिसत असणारे, विरळ बोटे असणारे असे पाय दारिद्र्य, दुःख सूचित करतात (८.१०. ३.–४) राजाचे हात हत्तीच्या सोंडेप्रमाणे गोल, गुडघ्यापर्यंत लांब सम असे असतात. तर अधनांचे आखुड व केसाळ असतात ( ३९ ). राजाचे तळहात उष्ण, तांबूस घाम न येणारे, मांसल, मऊ, तांबडी नखे असणारे, लांबट बोटांचे असे असतात (४३). तळहात लाल असल्यास मनुष्य धनवान असतो, निळा असल्यास मद्यपी, पिवळा असल्यास अगम्यागमन करणारा, डागाळलेला असल्यास निर्धन असतो ( ४४ ). हातावरील रेषा सूक्ष्म, स्निग्ध खोल असल्यास उत्तम (५७) त्या फाटे फुटलेल्या, रुक्ष, काळ्या असल्यास अशुभ (५९). हातावर मत्स्य, सिंहासन, छत्र, चामर इत्यादी चिन्हे ही शुभ आहेत. ( ७४–७८ ). हनवटी फार दीर्घ किंवा कृश असल्यास धनहानी होते ( ९९ ). मुख पूर्णचंद्राच्या आकाराचे शुभ असते, स्त्रियांप्रमाणे मुख असणारे अपत्यहीन ठरतात. वर्तुळाकार मुख असणारे धूर्त असतात. लांबट मुख असणारे दरिद्री ठरतात. मुख लहान असणारे कृपण असतात ( १०४ – १०६ ). गाल फुगलेले, तेजस्वी असणारा मनुष्य राजा होतो. गाल समपातळीत असणारा मंत्री होतो आणि खोल असणारा दरिद्री होतो ( १०९–११० ). पोपटाप्रमाणे नाक असणारे लोक सुखी, दीर्घायुषी असतात, मोठे नाक असणारे सुदैवी असतात, छोटे नाक असणारे चोर असतात. सपाट नाक असणारे आपल्या पत्नीचे दास बनतात, नाकाचे टोक वाकडे असणारे श्रीमंत असतात (११०–११२). डोळे पिवळे असणारा चोर. तांबडे असणारा राजा, निळे असणारा अहंकारी, पांढरे असणारा ज्ञानी, पिंगट असणारा धनवान ठरतो (११५-११६). रडताना दीनवाणे नसणे, अश्रु न येणे शुभ, दीनवाणेपणा, विपुल अश्रु अशुभ (१३७-१३८). कंपविरहित हसणे शुभ, डोळे मिटून हसतो तो

अनुक्रमणिका

पापी असतो (१३८). बैल, वाघ, सिंह, गरुड ह्यासारखे तोंड असणारे लोक शत्रूचा पराजय करणारे राजे ठरतात. रेडा, माकड, उंट, डुक्कर, बोकड ह्यांसारखे तोंड असणारे पुत्र व धन ह्याबाबतीत सुख मिळवतात. गाढव, उंट ह्यासारखे तोंड असणारे दरिद्री असतात (१६६–१६७). ह्याप्रकारचे फल-ज्योतिष आणि सामुद्रिक आडाखे सांगितल्यानंतर शेवटी असा शेरा मारला आहे की पूर्वजन्मामध्ये ज्यांनी शंकराची सेवा केली ते ह्या जन्मामध्ये सर्व-लक्षणपूर्ण आणि भाग्यशाली होतात (२०७). म्हणजे पूर्वकालातील शंकराच्या भक्तीमुळे ह्या जन्मात सामुद्रिकदृष्टचा चांगले शरीर आणि त्यामुळे चांगली फले असा हा कार्यकारणभाव आहे. म्हणजे ज्योतिःशास्त्र आणि सामुद्रिकशास्त्र ह्यांच्याही मुळाशी धर्मशास्त्र आहे.

आतापर्यंत सांगितलेले विषय सर्वच माणसांना लागू पडतील असे आहेत. परंतु शिवतत्त्वरत्नाकर हा ग्रंथ मुख्यत्वेकरून भरला आहे तो राजाला उपयोगी अशा विषयांनी. राज्यशास्त्र, व्यवहार इत्यादी विषयांचे विवेचन शिवतत्त्व-रत्नाकरात आले आहेच. पण त्याहीपेक्षा राजाने कशी चैन करावी, कसा उपभोग घ्यावा ह्याचे शिवतत्त्वरत्नाकर हे एक "गाईड" आहे; त्यामुळे राजाच्या विविध उपभोगांची अतिशय सविस्तर माहिती शिवतत्त्वरत्नाकरात आली आहे. त्यात नगरनिर्माण करणे, राजवाडे बांधणे, त्यातील चित्रे संगीत, वृक्षोपभोग, राजाचे स्नान, पादुका, वस्त्रे, दागिने, रत्ने ह्यांविषयीचे भोग, अन्नभोग, जादूचे प्रयोग पाहण्याचा भोग, काव्यभोग, पुत्रोपभोग, वाहनोपभोग, कुस्त्या, प्राण्यांची युद्धे ह्या प्रकारचे उपभोग सांगण्याच्या निमित्ताने वास्तु, चित्र, संगीत इत्यादी कला व त्यांची शास्त्रे; तसेच कामशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, पाकशास्त्र, काव्यशास्त्र, रत्नशास्त्र, रथविद्या, मानवाचे, पशूंचे आणि वृक्षांचे वैद्यकशास्त्र इत्यादी अनेक शास्त्रांची माहिती शिवतत्त्वरत्नाकरात आली आहे. अर्थातच येथेही हे लक्षात ठेवले पाहिजे की ती तथाकथित शास्त्रेसुद्धा विविध प्रकारचे लोकभ्रम, कर्मकांडे, विधि-निषेध इत्यादींनी भरलेली असून त्यांसाठी आधार धर्म हाच आहे.

राज्यशास्त्र :

प्रसामान्य – शिवतत्त्वरत्नाकरात राज्यशास्त्रविषयक विचार विविध ठिकाणी आले आहेत. राजाला सामान्य उपदेश करताना तृष्णा सोडून द्यावी, क्षमेचा आश्रय करावा, पापाच्या ठिकाणी बुद्धी ठेवू नये, खरे बोलावे, विद्वानांची सेवा करावी, दुःखितांवर दया करावी असे सांगितले आहे

(५.४.५३). तसेच सज्जनांबरोबर मैत्री करावी, दुष्टांचा सहवास सोडावा (४९), आत्मस्तुती टाळावी (५०, ५३), अनेक दाने द्यावीत, मनोहर वाक्य बोलावे (५०), शरणागतांचे रक्षण करावे, (५३), दान, प्रियवाक्ये, संमान ह्यांनी ब्राह्मणांचे पोषण करावे अशा प्रकारचा प्रसामान्य उपदेश आला आहे.

## शत्रुनाशाच्या युक्त्या -

दुर्बल अशा राजाने प्रबल अशा शत्रचा नाश करण्याकरिता विविध युक्त्या सांगितल्या आहेत. त्यातील काही वास्तव आहेत तर काही यातुधर्मात्मक आहेत. प्रतिपक्षी राजाच्या राज्यातील तलाव, विहिरी, सरोवरे ह्यात विष मिसळावे (५.५.३४) शत्रूला अन्न, पेय, तांबूल, फल, पुष्प, दागिने, वस्त्र, विलेपन, धूप, शय्या, आसन, पादुका, अंगाला लावावयाचे तेल, स्नानाचे पाणी, ह्यातून विष द्यावे (३५-३७). द्यूत, वादन, क्रीडा, शिकार, यात्रा, कुस्त्या, मेजवानी, ह्यासारख्या किंवा अन्य कार्यात शत्रू मग्न असता गनिमी काव्याने त्याला मारावे (३९-४०). हे उपाय वास्तव वाटतात. परंतु पुढील काही उपाय यातुधर्मात्मक आहेत. अथर्ववेदीय विधीत तज्ज्ञ असलेल्या, विजितेन्द्रिय, तंत्रमंत्र विधान जाणणाऱ्या ब्राह्मणांकडून शत्रूचा दुरूनच नाश करावा. त्यासाठी आभिचारिक होम, यंत्र, जप, धूप, मंत्रप्रयुक्त बाण, इत्यादींच्या साधनांनी शत्रूला मोहित करावे. त्याचे उच्चाटन करावे. (४१-४५). शत्रुसैन्यावर पुढीलप्रमाणे भस्मकूट प्रयोग करावा. अग्निहोत्र, स्मशान. अंत्यजाचे घर येथील भस्म (राख) आणावी. कालन कुवकुरू न लुहुभदु यत्तनुवित्तनूभं मंडलालिकरं तु नु कि आयुविहिके पुचिचहि मपिमलद्ग उद्भूतिद " हा मंत्र म्हणून शत्रुसैन्यावर ते भस्म टाकावे. म्हणजे शत्रुसैन्याचा क्षणात नाश होतो (६५-६७).

## राजाचे गुण

राजा व सामान्य मनुष्य ह्यांचे शरीर सारखेच असते पण क्षमा, धैर्य, आज्ञा, दान, पराक्रम ह्याबाबत राजामध्ये आधिक्य असते (५.६.२-३). राजाने हेररूपाने वायूप्रमाणे सर्वगामी असावी (१२). काम लहान असो किंवा मोठे ते सर्व शक्तीनिशी करावे हा गुण राजाने सिंहाकडून घ्यावा (१८). राजाने बगळ्याप्रमाणे इंद्रिये आवरून सर्व कामे साधावीत (१९). कोंबड्यापासून पहाटे उठणे हा गुण घ्यावा (२०). दूरवर पाहणे, सावध राहणे, अनालस्य हे गुण कावळ्यापासून घ्यावेत (२१). दमल्यानंतरही कामाचा भार वाहणे, थंडी-उष्णतेची पर्वा न ठेवणे, नित्यसंतुष्ट राहणे हे गुण गाढवापासून घ्यावेत (२३).

अधिकारी लोक हे मारकुटे, दुसऱ्यांना लुबाडणारे, धूर्त, असे जणू राक्षस असतात त्यांच्यापासून प्रजेचे रक्षण करावे (२६). जर राजाने रक्षण केले नाही तर डावा हात उजव्याची चोरी करील. सगळे बांध फुटतील, सर्वजण भयग्रस्त होतील (२७). नेहमी प्रजेचे पालन करणारा, प्रजेचे प्रेम मिळविणारा, राजा खूप धन प्राप्त करतो (३–४). जो प्रजेचे रक्षण करणार नाही त्या राजाचा जन्म अजागलस्तनाप्रमाणे व्यर्थ आहे (४–५). प्रजेला पीडा न दिल्यामुळे निर्माण झालेला अग्नी राजाचे कुल, श्री, प्राण ह्यांना जाळूनच मागे फिरतो (५-६). सद्‌गुणी राजालाच कीर्ती, सौख्य, सौभाग्य मिळते (२४).

## राजाचे प्रकार

राजांचे तीन प्रकार आहेत. स्वतःवर अवलंबून राहणारा, आत्मायत्त हा राजा उत्तम. स्वतःवर आणि मंत्र्यांवर अवलंबून असणारा द्रव्यादत्त हा मध्यम आणि केवळ मंत्र्यांवर अवलंबून राहणारा सचिवायत्त हा कनिष्ठ राजा होय (५.७.४–६).

## राजाच्या तीन शक्ती

राजाजवळ तीन शक्ती असल्या पाहिजेत. पहिली म्हणजे प्रभुशक्ती. कधीही न मोडली जाणारी आज्ञा ह्या स्वरूपाची म्हणजे प्रभुशक्ती (१५). दुसरी मंत्रशक्ती म्हणजे सल्ला-मसलत ह्या बाबतीतील सामर्थ्य. स्वतःच स्वतःशी केलेली सल्लामसलत. ही अत्यंत गुप्त राहते. ती ब्रह्मदेवालाही फोडता येत नाही. (१९). दुसऱ्याबरोबर सल्लामसलत करताना ती अतिशय गुप्तपणे करावी. त्यावेळी मुके, आंधळे, मूढ, स्त्री, बाल, वृद्ध, पोपट ह्यांना आपण दिसणार नाही आणि बोलणे ऐकू येणार नाही इतक्या दूर अंतरावर ठेवावे (२०). मंत्रविचार उंच एकांताच्या जागेत किंवा अरण्यात करावा. तो दुपारी जेवण झाल्यावर किंवा पहाटेच्या वेळी झोप झाल्यावर करावा (२१–२३). पुढील विषयावर मंत्रविचार करावा. शत्रुनाश, द्रव्यप्राप्ती, नोकरांचे पगार, मित्रांचा सत्कार, मुलांचे (राजाच्या स्वतःच्या) शिक्षण, अंतःपुरातील स्त्रियांचे संरक्षण, हत्ती, घोडे, इत्यादींचे शिक्षण, प्रजेचा संताप किंवा प्रेम, जमा, खर्च, ग्रहांची अनुकूलता, प्रतिकूलता, किल्ल्यांचे संरक्षण, खजिन्याची वाढ, विहिरी, बागा ह्यांचे रक्षण, चोरांचा नाश, धान्याची व्यवस्था इत्यादी (२३–३०). राजाची तिसरी शक्ती म्हणजे उत्साहशक्ती. उत्साहशक्तीचे स्वरूप म्हणजे उद्योगासाठी मन सतत उत्साही असणे, (३९–४०).

## राजनीतीचे स्वरूप

राजनीतीचे स्वरूप कसे असते हे सांगताना पुढील सुप्रसिद्ध श्लोक शिवतत्त्वरत्नाकरात उद्धृत केला आहे: सत्यानृता च परुषा प्रियवादिनी च। हिंस्रा दयालुरपि चार्थपरा वदान्या ॥ नित्यव्यया प्रचुरनित्यधनागमा च वाराङ्गनेव नृपनीतिरनेकरूपा ॥ ( ४० ) म्हणजे खरी आणि खोटी, कठोर आणि प्रियवादिनी, हिंस्र आणि दयाळू, अर्थपरा आणि उदार, नेहमी खर्च करणारी आणि नेहमी धनप्राप्ती होत असलेली अशी राजनीती वारांगनेप्रमाणे अनेक रूपे धारण करणारी आहे.

## कर, कोश :

राजाने पशु आणि सोने ह्यातील पन्नासावा भाग कर म्हणून घ्यावा. धान्याचा आठवा, बारावा किंवा सहावा भाग ज्या प्रमाणात पीक आले असेल आणि जमीन ज्या प्रकारची असेल त्या अनुसार घ्यावा ( ३६–३८ ). जी जमीन शेतीसाठी वापरण्यात येत नाही ती गायींना चरण्यासाठी वापरू द्यावी. देवालयाच्या आसपासच्या जागा मुनींना वापरू द्याव्यात. शहराच्या बाजूला असलेले, हरिणांनी संपन्न आणि क्रूर प्राणी नसलेले वन स्वतःसाठी ठेवावे. राज्याच्या टोकाला असलेल्या पर्वतमय वनाच्या रक्षणासाठी राजाने अधिकारी नेमावेत. त्या वनांतील फळे, मुळे, काष्ठ, गवत, भाज्या ह्यायोगे उपजीविका करणाऱ्या तेथील लोकांकडून दहावा हिस्सा कर म्हणून राजाने घ्यावा (४०–४३). प्रजेकडून कर घेताना तिला पीडा देऊ नये. दुधाची इच्छा करणाऱ्याने जर गायीचे स्तनच कापले तर त्याचा काही त्याला उपयोग होणार नाही. त्याचप्रमाणे राष्ट्राला पीडा देणारा राजा समृद्ध होऊ शकत नाही. राजाने पृथ्वीचे दोहन योग्य वेळीच केले पाहिजे ( २८–२९ ). राष्ट्रातून आलेल्या कराच्या उत्पन्नाचे राजाने चार भाग करून त्यातील तीन धर्म अर्थ काम ह्यासाठी वापरावेत आणि एका भागाने कोश तयार करावा. कारण कोशहीन राजा नष्ट होतो. ( ४४–४५ ).

## दुर्ग–

कोशाप्रमाणेच दुर्गाचेही महत्व फार आहे. जसा विषहीन नाग, मदहीन गज, त्याचप्रमाणे दुर्गहीन राजा पराधीन होतो. ( ४६ ). जलदुर्ग, गिरिदुर्ग, दगडांनी बांधलेला दुर्ग, विटांनी बांधलेला दुर्ग, वनदुर्ग, मरुदुर्ग, दारुदुर्ग आणि नरदुर्ग असे किल्ल्यांचे नऊ प्रकार आहेत. जलदुर्ग खोल पाण्याने वेष्टित असा

असावा. चढण्यास कठिण, पर्वताच्या शिखरावर बांधलेला आणि पाण्याने वेढलेला असा गिरिदुर्ग असावा. असा दुर्ग दगडांनी बांधलेला असावा. विटांनी बांधलेला, चुन्याचा लेप दिलेला आणि भोवती खंदक असलेला असा दुर्ग असावा. मातीचा बांधलेला तो मृत्तिकादुर्ग. दाट, काटेरी वृक्षांनी तयार झालेला तो वनदुर्ग. आत जेथे पाणी साठवलेले आहे आणि बाहेरच्यांना पाणी दुर्लभ आहे असा तो मरुदुर्ग. बांबूच्या लाकडांनी बनवलेला तो दारुदुर्ग. शस्त्रधारी महायोध्यांचा बनवलेला तो नरदुर्ग. ह्यांतील जलज आणि गिरिज किल्ले श्रेष्ठ, दारुदुर्ग आणि नरदुर्ग कनिष्ठ बाकीचे मध्यम दर्जाचे मानावेत (४७–५५). दुर्गात अनेक यंत्रे, आयुधे असावीत. त्याचे दरवाजे गुप्त असावेत. किल्यात दगड धोंडे, वाळू, कारागिरीची हत्यारे, औषधे, वाद्ये, गूळ, सर्व प्रकारची तेले, तूप, मध, गवत, सर्व धान्ये, माती, शेण इत्यादी व इतर सर्व आवश्यक वस्तूंचा साठा करावा ( ५६–६० ).

सैन्य

सैन्याचे मौल्य, भृत, मैत्र, श्रेण, आटविक, आणि अमैत्र असे सहा प्रकार आहेत. वंशपरंपरेने आलेले ते मौल्य, धन देऊन मिळवलेले ते भृत. मैत्री केले गेले ते मैत्र. ही तीन श्रेष्ठ सैन्ये आहेत. जन्म, कर्म ह्यामुळे संबंध आलेले आणि कराराने बांधलेले ते सैन्य श्रेण ह्या प्रकारचे. ते मध्यम दर्जाचे मानावे. पर्वताजवळ राहणारे, निषाद, म्लेच्छ ह्या जातींचे सैन्य म्हणजे आटविक. ते अधम मानावे. भ्यालेले शत्रु शरण आल्यावर त्यांचे जे सैन्य आपल्या ताब्यात येते ते अमैत्र नावाचे. त्याच्यावर कधीही विश्वास ठेवू नये किंवा ते जवळ राहू देऊ नये. युद्धात त्याला पुढे करावे (६१–६६). सैन्याला बाहुत्राण, शिरस्त्राण, अंगत्राण असावे. ते पताका, ध्वज इत्यादींनी शोभणारे असावे (६८). मौल्य सैन्यातील मुख्यांचा रत्न, अलंकार, वस्त्रे, प्रिय वाक्ये ह्यांनी सत्कार करावा (७१). त्यांना योग्यवेळी पुष्कळ पगार द्यावा. नोकरानाही वेतन योग्य वेळी द्यावे (७२). त्याना वेतन दररोज, दरमहा, तीन महिन्यांनी, चार महिन्यांनी, सहा महिन्यांनी किंवा दर वर्षी ज्याप्रमाणे त्यांचे काम असेल त्यानुसार द्यावे. दररोज गुप्त हेरांकरवी पाहाणी करावी. (७३–७४). दर पंधरा दिवसांनी स्वतः पहाणी करावी. त्यातील परिश्रमी, शूर आयुधधारी सैनिकांचा राजाने सत्कार करावा. आळशी व आयुधे नसणारे असे सैनिक असतील त्यांना शिक्षा करावी. ( ७५–७६ ) सैन्यास चांगले घोडे, हत्ती, रथ असावेत. (७७-८१).

अश्व- ( अश्वशास्त्र )-

शिवतत्त्वरत्नाकरात अश्वशास्त्रावर एक स्वतंत्र प्रकरण आहे. त्यात घोड्यांची माहिती सांगताना त्यांची पुराणकथात्मक उत्पत्ती दिली आहे. उदाहरणार्थ अमृताबरोबर समुद्रमंथनातून बाहेर पडलेला उच्चैःश्रवा हा अश्व. ब्रह्मदेवाच्या आणि अग्नीच्या अश्रूंपासूनही घोडे निर्माण झाले ( ७. १२. ३-४ ). अशा प्रकारच्या पुराणकथा हे प्राचीन भारतातील तथाकथित शास्त्रांचे एक महत्त्वाचे अंग आहे. पुराणकथा हे धर्माचे अविभाज्य अंग आहे. शास्त्राचे नाही हे लक्षात ठेवणे जरूर आहे. दुसऱ्या एका पुराणकथेत असे सांगितले आहे की पूर्वी घोड्यांना पंख होते व ते आकाशात उडणारे होते. इंद्राने शालिहोत्र ह्या मुनीला असे सांगितले की तू घोड्यांचे पंख तोड. म्हणजे ते वाहनयोग्य होतील. त्याने दर्भास्त्राने घोड्यांचे पंख तोडले. मग घोड्यांना मुनीने वर दिला की तुमचे पाय पंखासारखे वेगवान होतील तुम्ही देवांचे आणि राजांचे वाहन बनाल ( १५-२० ).

अश्वांच्या जाती

प्रत्येक गोष्टीचे विभाजन करताना त्यांचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्या प्रकारे करण्याचे एक वेड मध्ययुगीन भारतीय विचारसरणीत लागलेले दिसते. ह्या जातीनुसार केलेल्या विभाजनाने सादृश्यमूलक यातु कल्पना असते. अश्वांच्या जाती पाडताना असे म्हटले आहे की संयमी, शीलवान, शुद्धाचरणी, कांतिमान, पांढऱ्या रंगाचे, किंवा पिंगट रंगाचे, ज्यांना माला, सुगंध, खीर तूप, हे पदार्थ आवडतात ते घोडे ब्राह्मण समजावेत. तेजस्वी, रथाची धुरा घेण्यासाठी अधीर, रागीट, पराक्रमी, शूर, मोठ्या आवाजाचे, मोठ्या शरीराचे, काळे पांढरे असे घोडे क्षत्रिय समजावेत, वारा, ऊन सहन करणारे परिश्रमी, भारवाहक, तांबूस असे घोडे वैश्य वर्णाचे. अशुद्धाचरण करणारे, उष्टेमाष्टे खाणारे, धन्याला लाथा मारणारे, असे घोडे शूद्र समजावेत. ( २१-३३ ) हे विभाजन शास्त्रीय कसोट्यांवर आधारलेले नसून जादूटोण्यावर आधारलेले आहे हे स्पष्ट आहे.

अश्वविषयक शुभाशुभ फले

अश्वाच्या शुभाशुभलक्षणांचेही मूळ जादूटोण्यातच आहे. किंचित तांबूस ओठ, पातळ जीभ, घन, स्निग्ध व घट्ट दात, विशाल नेत्र, लहान, तिखट, कान, लांब मान, लांब आयाळ, विशाल छाती, गोल मांसहीन गुडघे, वर्तुळाकार

खूर, किंचित खोलगट पाठ, सरळ मांड्या ही शुभ लक्षणे समजावीत (४४-५७) तोंड, पाय, केस तांबडे असणाऱ्या अश्वाला भोर असे म्हणतात. पिकलेल्या जांभळाच्या रंगाप्रमाणे रंग असणाऱ्या घोड्याचे नाव जम्व्व (७९). अंगावरील केस आणि शेपटी पिवळी असणाऱ्याचे नाव हरित (८०). संपूर्ण पांढरा पण एकच कान काळा असणाऱ्या घोड्याला श्यामकर्ण असे नाव असून तो अश्वमेध यज्ञात ठार करण्यास योग्य असतो (८२). चारी पाय पांढरे आणि तोंड मध्ये पांढरे असणाऱ्या घोड्याला कल्याणपंचक म्हणतात, तो नेहमी कल्याणकारक असतो (८३). चारी पाय काळे असून संपूर्ण शरीर पांढरे असणारा घोडा म्हणजे साक्षात यमाचा दूतच समजतात. त्यामुळे मालक मरतो. म्हणून तो घोडा त्याज्य (९१). भस्माच्या रंगाच्या, वाकड्या शेपटीचा, संपूर्ण काळ्या रंगाचा, असलेही घोडे त्याज्यच समजावेत (१००-१०१). घोड्यांची गती सिंह, वाघ, हत्ती, हंस, मोर, शरभ, बैल, माकड, उंट ह्या प्राण्यांच्या गतीसारखी असल्यास ते धन्याची भरभराट घडवतात. पण वेडी-वाकडी, अडखळणारी, सौष्ठव नसलेली, अशी गती चांगली नव्हे (१०२). घोड्याचे कान, डोळे, मुख, नाक, घाम, मूत्र, विष्ठा, ह्यांचा गंध चांगला असला तर ते शुभ, वाईट असला तर ते घोडे वाईट (१०३). घोड्यांचा आवाज वीणा, वेणु, मृदुंग, दुंदुभी, ह्यांसारखा असल्यास तो शुभ. पण तोच कठोर बेसूर, उंटासारखा असल्यास धन्याचे वैभव नष्ट होते (१०५). अश्वाच्या छातीवर आवर्त (भोवरा) असला तर धनधान्यवृद्धी होते (१४२). वरच्या ओठावर असला तर मालकाची आई मरते (१५२). खालच्या ओठावर असला तर मालक स्वतः मरेल (१५३). कानाच्या टोकावर असेल तर अर्थनाश होतो. (१५६). शेपटीवर असल्यास पराजय होतो (१६०). कपाळावर उजवीकडे वळलेले जुळे आवर्त असल्यास शत्रुनाश होतो (१७६-१७७).

घोड्याच्या हालचालीवरून भविष्य सूचित होते. सकाळी उठल्याबरोबर जर घोडा तोंड वर करून ओरडला, खुराने जमीन खणू लागला तर विजय प्राप्त होतो (२१४). घोडा जेव्हा एकाएकी मूत्रपुरीषोत्सर्ग करतो किंवा रडतो तेव्हा तो पराभव सूचित करतो (२१५). घोडा जेव्हा पहाटे मोठ्याने ओरडतो तेव्हा तो शत्रूचे आक्रमण सूचित करतो (२१५). जेव्हा तो तोंडात अकारण माती घालतो, किंवा शुष्क तृण, लाकूड तोंडात घालतो तेव्हा तो भय सूचित करतो. (२२२).

## अश्वाचा वेग

अश्वाचा वेग हा अत्यंत महत्त्वाचा असतो. त्याला जर वेग नसेल तर त्याचे रूप, रंग, अंगावरील भोवरे इत्यादी सर्व व्यर्थ सोय ( ७.१३.१४७ ). म्हणून अश्व नेहमी शंभर धनुष्ये इतके अंतर पळत जाऊन परत येतो तो घोडा उत्तम समजावा. जो एवढेच अंतर २४ मात्रात पळतो तो मध्यम दर्जाचा घोडा आणि बत्तीस मात्रात पळणारा अधम ( १४८–१५० ).

## अश्वारोहण

घोडेस्वाराजवळ काही गुण आवश्यक असतात. तो घोड्यावर उत्तम ताबा असणारा, अश्वारोहणाची सवय असणारा, अश्वाचे मन जाणणारा, बुद्धिमान, समयज्ञ, वाऱ्याचा त्रास न होणारा, मान ताठ ठेवणारा, आसन स्थिर ठेवणारा असा असावा ( १५१ ). तो जर लठ्ठ, रागीट, मूर्ख, भ्यालेला, पक्का न बसलेला, उगीचच मारणारा असेल तर घोडा पळत नाही ( १५५ ). ब्राह्मण घोड्याला चालायला लावण्यासाठी भक्ष्य पदार्थ द्यावा. क्षत्रिय घोड्याला सौम्य शब्द बोलून चालवावे, वैश्य घोड्याला शब्दाने शिक्षा करून आणि शूद्र घोड्याला दण्डाने मारून चालवावे ( १५६ ). घोड्याला कधी कुठे मारावे ह्याबद्दल पुढीलप्रमाणे नियम आहेत. तो जर खिकाळू लागला तर नाकावर मारावे, चुकू लागला तर गालावर, भ्याला तर हृदयावर, भलत्याच रस्त्याने जाऊ लागला तर मांड्यावर आणि गुडघ्यावर, रागावला तर कुशीत, आणि चिडला तर कानावर मारावे ( १५८–१५९ ). घोड्यांना चालवले नाही तर मुळात ते जरी सर्व कामे करण्यास क्षम असले तरी त्यांची क्षमता नष्ट होते. त्यांना फार चालवले तर कृश, रोगी होतात ( १६०–१६१ ) म्हणून त्यांना प्रमाणात चालवले पाहिजे.

## अश्व : एक देवता

घोड्याकडे केवळ एक उपयुक्त पशू ह्या दृष्टीने पाहिले गेलेले नसून धार्मिक दृष्टीने पाहिले गेले आहे. त्याच्या ठिकाणी सर्व देवता राहतात. म्हणून तो सर्वदेवतामय आहे. त्याचे डोके म्हणजे ब्रह्मा, डोळा म्हणजे सूर्य, कपाळ म्हणजे चंद्र, नाक म्हणजे निर्ऋति, जीभ म्हणजे सरस्वती, टाळु म्हणजे शुक्र, तोंड म्हणजे बृहस्पति, हनुवटी म्हणजे मित्रावरुणौ, कण्ठ म्हणजे चंद्र, अंगावरील केस म्हणजे गंधर्व, आयाळ म्हणजे वीज, छाती म्हणजे साध्य देव, पुढचे पाय म्हणजे अश्विनौ, गुडघे आणि मांड्या म्हणजे दिशा,

अनुक्रमणिका

त्याचे मन म्हणजे वरुण, वेग म्हणजे विष्णु, त्याची प्रसन्नता म्हणजें कुबेर (१७८–१८५) ह्यावरून घोड्याकडे धार्मिक दृष्टीतून पाहिले जात होते आणि अश्वशास्त्र हा एक धर्मशास्त्राचाच भाग होता, प्राणिशास्त्राचा नव्हे हे कळून येईल.

हत्ती ( गजशास्त्र )

घोड्याप्रमाणेच राजाला उपयुक्त असा दुसरा प्राणी म्हणजे हत्ती. म्हणून शिवतत्त्वरत्नाकरात गजशास्त्रही समाविष्ट झालेले आहे. हे गजशास्त्रही प्राणिशास्त्राचा भाग नसून व्यापक अर्थाने धर्मशास्त्राचाच भाग आहे. त्यामुळे गजशास्त्रही पुराणकथा, शकुन, अपशकुन, वर्ज्यावर्ज्यता कर्मकांड इत्यादी विषयी तपशील विपुल प्रमाणात मिळतात.

हत्तींची उत्पत्ती सांगताना अशी कथा वर्णिली आहे की, पूर्वी हत्ती स्वर्गात हिंडत. पण एका मुनीच्या शापामुळे ते भूमीवर अरण्यातील पशु ह्या रूपात निर्माण झाले. ( ७. ११. ८ ). हत्ती मिळण्याची ठिकाणे म्हणून गंगासागर, हेमाद्रि आणि प्रयाग ह्यामधील वने, तसेच श्रीशैल, वेदशैल, ह्यांचे वन, सह्याद्रीच्या भृगु कच्छातील वन, सौराष्ट्र इत्यादी प्रदेश सांगितले आहेत. ( ९–१४ ). सात विती उंच. नऊ विती लांब, आणि दहा विती परिघ असलेला हत्ती शुभ समजावा ( २७ ). पर्वतावर हिंडणाऱ्या, फार कृश नाही फार मोठा नाही, मधाच्या रंगाप्रमाणे दातांचा व डोळ्यांचा रंग असलेल्या धनुष्याप्रमाणे पृष्ठरज्जु असणाऱ्या, प्रमाणबद्ध शरीराच्या आणि गोल अवयवाच्या हत्तींना भद्र अशी संज्ञा असून त्यावर बसण्याची काही जादुटोण्याच्या स्वरूपाची फले आहेत, ती म्हणजे यश आयुष्य ह्यांची प्राप्ती, पाप नष्ट होणे, बल आणि तेज वाढणे. हत्तींचा दुसरा प्रकार मंद्र. हे हत्ती सरोवराजवळ राहणारे, उंच, सहनशील, संहारप्रिय मोठी सोंड, कान असणारे, मोठे पोट असणारे, असे असतात. मृग हत्ती हा हत्तींचा तिसरा प्रकार होय. हे हत्ती अरण्यात संचार करणारे, शिथिल मांसाचे, स्निग्ध वर्णाचे, सोंड, पाय आणि मान वक्र व कृश असणारे असे असतात ( ३३–३९ ). हत्तीमध्ये दैवी अंश असतो आणि त्यामुळे त्यांची विविध फळे मिळतात. उदा. ब्रह्मदेवाचा अंश असलेल्या हत्तीच्या अंगावर पांढरे ठिपके असतात. हा हत्ती राजाला आरोग्य व विजय प्राप्त करून देतो. ( ४४–४५ ). दीर्घ काल मद टिकणारा, शूर, मेघनादाने आनंदित होणारा हा हत्ती प्रजापतीचा अंशभूत असतो. त्यामुळे प्रजाभिवृद्धी होते. ( ४७ ). अग्न्यंश हत्तीचे केस अग्नीच्या ज्वाळाप्रमाणे असतात. डोळे पिंगट

असतात. युद्धात तो साक्षात अग्नीप्रमाणे शत्रुसैन्याचा नाश करतो. (५६–५७). विष्णवंश हत्तीची सोंड निमुळती असते. त्याचा निःश्वास सुगंधी असतो. सर्वांगावर केस असतात. त्याच्या दातांचा रंग सोनेरी केवडयाप्रमाणे असतो. तो बुटका असून त्याच्या अंगावर शंखचक्रगदेच्या आकाराचे ठिपके असतात. तो हस्तिराज म्हणून अभिषिक्त होण्यास पात्र असतो. त्या हत्तीमुळे धन-धान्याची समृद्धी होते ( ६०–७० ). अशा रीतीने हत्तीमध्ये दैवी अंश असतो. हत्तीच्या देवतांशत्वामुळे त्यांना धार्मिक महत्त्व होते, आणि गजशास्त्र हे एक धर्मशास्त्राचेच अंग होते हे दिसून येईल.

हत्तींच्याही ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादी जाती पडलेल्या आहेत. ब्राह्मण हत्ती पाण्यात डुंबायला आवडणारा. क्रोधिष्ट, भित्रा, खादाड कुरकुला असा असतो. क्षत्रिय जातीचा हत्ती शूर, उत्साही, युद्धकुशल, युद्धात न घाबरणारा, असा असतो. वैश्य हत्ती तोंडात घास साठवून ठेवणारा, प्रज्ञावान आणि दीर्घकाळ क्रोध मनात धरणारा असा असतो. शूद्र हत्ती नीच, गलिच्छ, मारल्याशिवाय वठणीवर न येणारा असा असतो ( ७३–७७ ).

शस्त्रविद्या–

युद्धाच्या दृष्टीने शस्त्रे, शस्त्रविद्या ह्यांचे महत्त्व असल्यामुळे शिवतत्व-रत्नाकरात शस्त्रविद्या आली आहे. शस्त्र आणि विशिष्ट जाती ह्यांचा संबंध येथेही जोडला आहेच. त्यानुसार ब्राह्मणाला धनुष्य, क्षत्रियाला तलवार, वैश्याला भाला आणि शूद्राला गदा अशी शस्त्रे ठरवली आहेत. ( ८.२. २४–२५ ). शस्त्रानुसार युद्धाचे सात प्रकार केले आहेत. धनुर्युद्ध, चक्रयुद्ध, भालायुद्ध, तलवारयुद्ध, छुरिकायुद्ध गदायुद्ध आणि बाहुयुद्ध (२५-२६). ही साती युद्धे ज्याला येतात तो आचार्य पदवीस पात्र होतो. चार येणाऱ्याला भार्गव, दोन येणाऱ्याला योद्धा आणि एक येणाऱ्याला गुणक म्हणतात ( २६–२७ ). वार, नक्षत्र इत्यादी योग्य आहेत हे पाहून शस्त्रविद्याध्ययनास प्रारंभ करावा ( २७–३० ). प्रथम देवतांना उद्देशून होम करावा. दाने द्यावीत. ब्राह्मण कुमारिका याना भोजने द्यावीत. तापस. शिवयोगी ह्यांची पूजा करावी. गुरूंची फुले वगैरेनी पूजा करावी ( ३१–३२ ).

धनुर्विद्येचे महत्त्व सांगताना असे म्हटले गेले आहे की नगरात एखादा तरी धनुर्धर असावाच. त्यामुळे शत्रू हल्ला करण्यास धजावत नाहीत. ( ८. २. ३ ). धनुर्विद्या आचार्यांनी चांगल्या ब्राह्मणालाच शिकवावी. लोभी, धूर्त, कृतघ्न, मंदबुद्धी अशा विद्यार्थ्यांस ही विद्या देऊ नये. ( २३.२४ ).

शिष्याने उपोषण करून, धूतलेले वस्त्र नेसून, हात जोडून, गुरूकडे धनुष्य मागावे गुरूने धनुष्य अभिमंत्रित करून मग शिष्याला द्यावे. ( ३३.३४). धनुर्धराच्या स्वतःच्या ताकदीपेक्षा धनुष्य हे नेहमी थोडे लहान असावे. धनुर्धरापेक्षा धनुष्य मोठे असे असता कामा नये ( ३९–४० ). धनुष्याचा दंड तीन, पाच, सात किंवा नऊ पर्वाचा असणे शुभ असते. चार, सहा किंवा आठ पर्वांचा असणे अशुभ असते. धनुष्याचा दंड अपक्व किंवा अतिजीर्ण, जळलेला, भोक पडलेला असणे अशुभ ( ४५–४७ ). धनुष्याची दोरी सलग, तिपेडी तंतूंची, हरिणीच्या स्नायूची किंवा म्हैस, गाय, ह्यांच्या स्नायूची किंवा पिकलेल्या बांबूच्या सालीपासून बनवलेली अशी असावी. ( ५६–५८ ). बाण हे फार जाड, किंवा फार बारीक, अपक्व, निकृष्ट जमिनीत तयार झालेले किंवा फाटलेले नसावेत ( ६२ ). ते दोन हात लांब आणि करंगळीएवढे जाड असावेत ( ६४ ). त्याला हंस, बगळा, क्रौंच किंवा गृध्र ह्या पक्षांची पिसे लावावीत (६५). त्याचे टोक लोखंडी, धारदार आणि बाणाच्या आकारमानास साजेसे असे असावे. ( ७० ). टोक आरीसारखे खुरप्यासारखे, अर्धचंद्राकार किंवा सूचीमुख, काकमुख असे असावे (७१–७२). पाच प्रकारचे क्षार मधासह, मोहरीसह, बारीक करवून त्याचा लेप टोकाला द्यावा व ते अग्नीत तापवावे. (७७). शरसंधानाचे चार प्रकार आहेत. पहिल्या प्रकारात धनुर्धरही स्थिर असतो आणि लक्ष्यही स्थिर असते. दुसऱ्या प्रकारात धनुर्धर स्थिर असतो पण लक्ष्य चलही असते. तिसऱ्या प्रकारात लक्ष्य स्थिर असते पण धनुर्धर चल असतो आणि चौथ्या प्रकारात धनुर्धर आणि लक्ष्य दोन्ही चल असतात. (१००–१०३). शरसंधान करण्यापूर्वी शिव. गणेश, गुरु, धनुष्य, बाण ह्यांना नमस्कार करावा गुरुची आज्ञा घ्यावी. मग शरसंधानास प्रारंभ करावा ( ११७ ). लक्ष्यस्थानी कांस्यपात्र ठेवून त्यावरती खडा मारावा. जेथून ध्वनी आला असेल ते लक्ष्य डोळे बंद असलेल्या धनुर्धराने कान व मन ह्यांच्या योगे निश्चित करावे. व बाण मारावा. रोज थोडे थोडे अंतर दूर जाऊन हा शब्दवेधाचा अभ्यास करावा. शब्दवेध हा कठीण असून तो सुदैव असेल तरच एखाद्याला जमतो. (१५६–१५९).

तलवारीविषयी माहिती सांगताना शिवतत्त्वरत्नाकरात असे म्हटले आहे की तलवार पन्नास अंगुळे लांब असल्यास ती श्रेष्ठ, चाळीस अंगुळे असल्यास ती मध्यम आणि छत्तीस अंगुळाची अधम ( ५.९.२६–२७ ). युद्धात जय मिळविण्यासाठी तलवारीमध्ये अनेक यातुधर्मात्मक गुण असले

पाहिजेत. (२२). तलवारीत जर काही दोष असतील तर त्याचे यात्वात्मक असे वाईट परिणाम घडतील. उदा. तलवार जर फुटकी असेल तर मृत्यू घडतो. तिला जर छिद्र पडले असले तर दारिद्र्य प्राप्त होते (२६–२७). ह्या उलट तलवारीच्या काही शुभ गुणांचे यात्वात्मक शुभ फलही मिळते. तलवारीवर शंख, चक्र, तोरण, चामर, ध्वज, मत्स्य, कासव, माला, इत्यादी चिन्हे असल्यास ते शुभ असते. (२८–२९). तलवारीवर पीठासह शिवलिंग जर चित्रित केलेले असले तर वीष आणि वीज ह्यांचे भय दूर होते. हंस, सारस चक्रवाक ह्यासारख्या पक्ष्यांची चित्रे असतील तर संपत्ती, विजय ह्यांची प्राप्ती होते (२९–३२). तलवारीबाबत पुढील प्रकारचे यात्वात्मक निषेध आहेत. तलवार अकारण उपसू नये. तिच्यात स्वतःच्या मुखाचे प्रतिबिंब पाहू नये. तिची किंमत सांगू नये इत्यादि (५९). अशा रीतीने राजाला उपयोगी असणाऱ्या शस्त्रविद्येत यातुधर्मात्मक कल्पनांचे प्राबल्य दिसून येईल.

## युद्धनीती–

शिवतत्वरत्नाकरातील युद्धनीतीचे विवेचन करताना संधी, विग्रह इत्यादींचे पुढीलप्रमाणे विवेचन आले आहे. संधी म्हणजे तह यांचे चार प्रकार असतात. मित्रसंधी म्हणजे एखादा राजा सज्जन आहे असे मानून त्याच्याशी मैत्रीचा स्वतः होऊन करार करणे, संधिजसंधी हा आपली मुलगी दुसऱ्या राजाला देऊन केला जातो. परस्परोपकाराख्यसंधी हा एकमेकावर उपकार करण्यासाठी केलेला असतो. उपहारसंधी हा दुसऱ्या राजाला हत्ती, घोडे. रत्ने, सोने, भूमी ह्यांच्या भेटी देऊन केलेला असतो (५.११.२९-३४). विग्रह म्हणजे युद्ध. हे नेहमी शौर्य, मदत, सामर्थ्य, सल्ला-मसलत, ह्या गोष्टींनी विरहित असलेल्या राजाशी करावे. (३४ ३५). त्याचे आठ प्रकार आहेत. कामज युद्ध हे एखाद्या स्त्रीच्या प्राप्तीसाठी घडते. लोभज युद्ध द्रव्यापहरणासाठी असते. भूमव युद्ध जमिनीच्या प्राप्तीसाठी असते. सूड घेण्यासाठी केलेले युद्ध हे मानज युद्ध. अभय नावाचे युद्ध शरणागताला अभय देण्यासाठी त्याच्या रक्षणासाठी केले जाते. मित्रासाठी, बांधवांसाठी केलेल्या युद्धाला इच्छाज असे म्हणतात. मदिरा, धन, विद्या इत्यादीचा माज चढून त्यामुळे केलेले युद्ध हे मदज; आणि दोघाही पक्षाना जेव्हा एकच गोष्ट हवी असते तेव्हा होणारे युद्ध हे एकद्रव्याभिलाषक ह्या नावाचे समजावे. असे विग्रहाचे आठ प्रकार आहेत (३६-४३.) यान म्हणजे हल्ला हा दुर्दैवाच्या कचाटयात सापडलेल्या, व्याधिपीडित सैन्य, व कोश नसणाऱ्या, मित्रविमुक्त

अशा राजावर करावा. तो शरद् किंवा वसंत ऋतूत अनुकूल शकुन पाहून करावा. (४४-४६). हल्ला करण्याच्या वेळेला अर्जुनाच्या पुढील नावाचा जप करावा. अर्जुनः फाल्गुनः पार्थः किरीटी श्वेतवाहनः । बीभत्सुः विजयः कृष्णः सव्यसाची धनंजयः ।। त्यामुळे विजयप्राप्ती होते (६९-७१). हल्ला करण्यास निघण्याच्या आधी ध्वजाच्या फडक्यावर स्वस्तिक, गरुड, वज्र ह्यांची चित्रे काढावीत व त्यांची गंध पुष्प, अक्षता, मंत्र ह्यांनी पूजा करावी. (७४-७५). काही वेळा राजाने आसन म्हणजे स्वस्थ राहणे हेच हितकर करते. शत्रूच्या देशात पाऊस न पडल्यामुळे दुष्काळ झाला असता, त्या दुःखाने त्या देशातील लोक आपापसात भांडून त्यांचा आपोआपच नाश होऊ लागेपर्यन्त विजयेच्छु राजाने स्वस्थ राहणेच फायदेशीर (५.१२.२-३) आपले सैन्य कमी झाले असता, बलवत्तर राजा पीडा देत असता, आश्रय करावा लागतो. हा आश्रय पीडा करणाऱ्या शत्रूला शरण जाणे, त्याहून अधिक बलवान अशा राजाच्या आश्रयाला जाणे किंवा दुर्गाचा आश्रय घेणे ह्या तीन प्रकारचा असतो (२३-२९). काही वेळेला राजाने द्वैधीभावाने वागावे लागते. मनात विरोध पण बाहेरून प्रिय भाषण, सांगावयाचे एक पण मनात दुसरेच ठरवावयाचे हा द्वैधीभाव (३०-४३). संधी विग्रह, यान, आसन, आश्रय, द्वैधीभाव ह्या गोष्टी जो उत्तम प्रकारे जाणतो तो सर्व पृथ्वीचा अधिपती होतो (४१-४२). राजाने योग्य वेळी साम, दान, भेद व दंड ह्या चार उपायांचा अवलंब करावा. त्यातील साम हा श्रेष्ठ, भेद हा मध्यम, दान हा कनिष्ठ, आणि दण्ड हा अतिकनिष्ठ होय ( ४३–४४ ). साम ह्या उपायात मधुर भाषण हा पहिला प्रकार. दुसरा प्रकार देवाची शपथ घेऊन बोलणे, तिसरा जुन्या मैत्रीची आठवण करून देणे. चौथा ग्राम, पुर, हत्ती, धन इत्यादी देण्याचे आश्वासन देणे, आणि पाचवा मी तुझ्यासाठी स्वतःचे शरीर सुद्धा अर्पण करीन असे म्हणणे. ( ५०–५७ ). एखाद्याला त्याच्या राजापासून फोडणे म्हणजे भेद तो करताना त्याला तुला तुझा राजा धन देत नाही, तुझी तो मानहानी करील, तुला बंधनात टाकील, तुझ्या बायकोची राजाला अभिलाषा आहे, असे सांगावे (५८–७१). दान हा उपाय करताना ज्याला जे हवे असेल ते त्याला द्यावे, किंवा त्याला वर्षभराचा खर्च द्यावा. हत्ती, घोडे, ग्राम, अलंकार, वस्त्रे, आसन, चामर, छत्र, सोने, रुपे, कन्या, वेश्या, समुद्रकाठचे व्यापारी शहर इत्यादी माणसाना वश करावे (७७–९६). वरील तिन्ही उपाय निरुपयोगी झाल्यावर चौथा उपाय करावा. तो म्हणजे दंड. त्यात शत्रूच्या देशाचा नाश, तेथील लोकांचे अवयव तोडणे,

त्या देशातील गायी, माणसे, धान्य पळवणे, तेथील लोकांना कैदेत टाकणे, जाळपोळ करणे, ठार करणे, इत्यादी प्रकार आचरावेत (१०२–१०५) युद्ध करताना युद्धाच्या आदल्या दिवशी सामंतांचा, सैनिकांचा वस्त्राभरणांनी सत्कार करावा. (५.१४.४) त्यांना हत्ती, घोडे द्यावेत. (५). त्या दिवशी रात्री मोठा वाद्यध्वनी करावा. राजाने कुशशय्येवर झोपावे. सकाळी उठल्यावर आरशात तोंड पहावे (९). स्नान करून जगन्नाथाची पूजा करावी. ब्राह्मणांना दाने द्यावीत. (१०–११). युद्धात चांगले थोडे सैनिक सुद्धा मोठ्या वाईट सैन्याला भारी ठरतात. (४०). युद्धात पळून येणाऱ्याला ब्रह्महत्येचे पाप लागते. तर युद्धात मरणाऱ्याला अश्वमेधाचे पुण्य लागते (२४६) युद्धात हत्ती, प्रेक्षक, पळून जाणारे स्त्री, पतित ह्यांना मारू नये. (४७). युद्धास जाताना उंटांच्या सहाय्याने पुष्कळ पाणी न्यावे (७५). इत्यादी युद्धविषयक उपयुक्त नियम शिवतत्त्वरत्नाकरात दिलेले आढळतात. मात्र शिवतत्त्वरत्नाकरात वर्णिलेल्या युद्धशास्त्रातही वाद्यांचा मोठा आवाज, ब्राह्मणपूजा, देवपूजा इत्यादी विधी सांगितले असल्याने युद्धशास्त्राचे यातुधर्मात्म स्वरूप स्पष्ट होईल.

## राजाचे मदतनीस

राजाला राज्यकारभारात व इतर बाबतीत साहाय्य करणारे लोक विशिष्ट गुणवत्तेचे व दर्जाचे असले पाहिजेत. उदाहरणार्थ, महाराणी (महिषी) ही विनीत, गुरुजनांबद्दल आदर असलेली, कोप ह्यांनी विरहित कृत्य, अकृत्य जाणणारी सवतींविषयी रागद्वेष नसणारी, मंत्री, सचिव ह्यांना मान देणारी, नागरिकांचे हित करणारी अशी असली पाहिजे. मंत्री कुलीन, ज्ञानी, पवित्र, नीतिशास्त्रज्ञ, जमाखर्चनिपुण, आणि राजा कुमार्गाने चालल्यास त्याला विरोध करणारे, असे असावेत. राजाचे पुरोहित शान्तिकर्म आणि पुष्टिकर्म करण्यात कुशल, अथर्वकुशल असे असावेत. ज्योतिषी द्वेष न करणारे, नित्य संतोषी, ब्राह्मण, गणितज्ञ, ग्रहाचारविद्यातज्ञ असे असावेत. सेनापती वीर, कुलीन, चार भाषा येणारे असावेत. कोशाध्यक्ष लोखंड, वस्त्र, रत्न ह्यांची पारख असणारा, आप्त, मोठे कुटुंब असणारा, सावधान, हिशोबी, संतुष्ट असावा. गणक हा गुणाकार, भागाकार, त्रैराशिके जाणणारा असावा. कारकून एकदा सांगितल्यावर ग्रहण करणारा, वेगाने लिहिणारा असावा. सूद म्हणजे आचारी वंशपरंपरेने चालत आलेले. संतुष्ट, प्रेमळ, नखे कापलेले, विविध पाककृती जाणणारे, शत्रूंना फितूर न होणारे असावेत. वैद्य सुद्धा परंपराप्राप्त, शस्त्रकर्मज्ञ, मंत्रयंत्र, औषधांचे ज्ञान असलेले, माणसे, गायी बैल, पक्षी ह्यांची चिकित्सा जाणणारे

अनुक्रमणिका

असे असावेत, अन्तःपुरातील सेवक आंधळे, पांगळे, कुबडे, वृद्ध असावेत. सभासद धर्मशास्त्रात कुशल कुलीन, असावेत ( ५.१५.२९-१०४ ). ह्या विविध राजसहाय्यांच्या गुणातील काही गुण यातुधर्मात्मक आहेत हे लक्षात येईलच.

व्यवहार

राजाच्या कर्तव्यातील एक महत्वाचा भाग म्हणजे व्यवहार किंवा न्यायव्यवस्था. शिवतत्वरत्नाकरात ह्याबाबत दोन पर्याय दिले आहेत. एक म्हणजे राजाने ही व्यवस्था स्वतः पाहाणे किंवा त्यासाठी अधिकारी नेमून त्याद्वारा करवणे. पहिल्या पर्यायाने राजाने क्रोध लोभ विवर्जित होऊन विद्वान अशा ब्राम्हणासह न्यायदानाचे काम पाहावे ( ८.१.१८ ). किंवा दुसऱ्या पर्यायानुसार सभ्य माणसे मदतीस देऊन एखाद्या सर्वधर्मज्ञ ब्राह्मणावर हा भार सोपवावा. ही सभ्य माणसे श्रुताध्ययनसंपन्न, धर्मज्ञ, सत्यवादी, शत्रु, आणि मित्र दोघाशीही सारखेच निःपक्षपाती, असे असावेत ( ८. १. १९-२० ). मात्र जर सभ्य म्हणून नेमलेल्यानीच राग, लोभ, भय ह्यांसारख्या कारणांमुळे स्मृतीविरुद्ध वर्तन केले तर त्यांना जितक्या रकमेचा खटला असेल त्याच्या दुप्पट दंड करावा ( २१ ). एखाद्या व्यक्तीर स्मृतीविरुद्ध किंवा आचारविरुद्ध अशा मार्गाने इतरांकडून आक्रमण झाले आणि त्याने ते राजाला कळवले की ते व्यवहारपद म्हणजे खटल्याचा विषय होतो ( २३ ). एखादा आरोपी किंवा साक्षीदार दोषी आहे की नाही ते पुढील चिन्हावरून ठरवता येते. तो इकडून तिकडे येरझारा घालू लागला, त्याच्या कपाळावर घाम आला, मुख पांडुरके झाले, वाक्यात अडखळला, परस्परविरोधी असे बरेच बोलला तर तो दोषी समजावा ( ३०-३२ ). साक्षीदार हे कुलीन, धार्मिक, खरे बोलणारे, सरळ मार्गी, पुत्रवान, धनी, श्रौतं स्मार्त क्रिया करणारे, आणि संख्येने कमीतकमी तीन असावे ( ८७-८८ ), स्त्री, बाल, वृद्ध, मत्त, वेडे, पतित, विकलेन्द्रीय, आप्त, अर्थसंबंधी, शत्रू, चोर, पाखंडी ह्यांना साक्षीदार करू नये ( ८९-९० ). जो साक्षीदार खोटी साक्ष देईल त्याला तो लोक प्राप्त होतो की जो स्त्री, बाल ह्यांची हत्या करणाऱ्यांना, आगी लावणाऱ्यांना, मिळतो ( ९३ ). साक्षीदार नसल्यास स्वतःच्या हाताने लेख्य केले तर तेही प्रमाण मानले जावे. मात्र ते कपटाने किंवा बळजबरीने केलेले नसावे ( १०८ ). खटल्याच्या निकालासाठी आणखी एक प्रमाण म्हणजे दिव्य. सूर्योदयाच्या वेळी सचैल स्नान केलेल्या, उपोषित असलेल्या, आरोपीला नृप आणि ब्राह्मण ह्यांच्या संनिध दिव्य करावयास लावावे ( ११६ ). त्यात अग्निदिव्य करताना पुढील मंत्र म्हणून तापलेला लोखंडी गोळा हातात घेऊन अग्नीभोवती सात





प्रदक्षिणा कराव्यात. 'त्वमग्ने सर्वभूतानामन्तश्चरसि पावक। साक्षिवत्पुण्यपापेभ्यो ब्रूहि सत्यं कवे मम ॥' ह्यानंतर जर हात भाजलेले नसतील तर तो निर्दोष समजावा. (१२४–१२८). जलदिव्य करताना "सत्येन माभिरक्षस्व वरुण" असे म्हणून पाण्यात तोंड घालून बसावे. ह्याच वेळी सोडलेला बाण एखाद्या वेगवान माणसाने पळत जाऊन आणावा. ह्या पळून आलेल्या माणसास जर आरोपी पाण्यातच बसलेला दिसला तर तो दोषमुक्त समजावा. (१२९–१३०). विषदिव्य करताना– त्वं विष ब्रह्मणः पुत्रः सत्यधर्मे व्यवस्थितः । त्रायस्वास्माद-भिशापात् सत्येन भव मेऽमृतम् ॥ हा मंत्र म्हणून हिमालयावर उद्‌भवणाऱ्या श्रृंग नावाच्या वनस्पतीपासून काढलेले वीष भक्षण करावे. त्यानंतर ओकारी, मलोत्सर्ग वगैरे कांही न होता ते वीष जर पचले तर आरोपी निर्दोष समजावा. (१३१ – १३२). अशा प्रकारच्या दिव्यावरून न्यायव्यवस्थेचा आधारही कसा यातुधर्मात्मक होता हे कळून येईल.

## कर्ज

कर्जाबद्दल पुढील प्रकारचे नियम दिसतात. अविभक्त कुटुंबासाठी कुटुंबप्रमुखाने ऋण काढले व तो मृत झाला किंवा दूर निघून गेला तर ते ऋण फेडण्याची जबाबदारी त्याच्या वारसदारावर येते (६३). पती किंवा पुत्रांनी केलेले ऋण स्त्रीला परत फेडावे लागणार नाही. तसेच पुत्राने केलेले पित्याला, तसेच कुटुंबासाठी घेतलेले सोडून इतर कोणतेही स्त्रीने घेतलेले ऋण पतीला परत करावे लागणार नाही (६४). मद्य, द्यूत कामप्राप्ती ह्यासाठी केलेले पित्याचे ऋण पुत्राला परत फेडावे लागणार नाही. (६५).

वाटणीबद्दल पुढील प्रकारचे नियम आहेत. पित्याने वाटणी करताना ती आपल्या इच्छेनुसार करावी किंवा थोरल्या मुलास जास्त भाग द्यावा किंवा सर्वांना सारखा द्यावा (१३५). क्लीब, पतित, मूढ, अंध, न बरा होणारा रोगी ह्यांना वाटणीचा हिस्सा दिला जाणार नाही, तरी त्यांना पोसले गेले पाहिजे. अशा लोकांचे जे औरस किंवा क्षेत्रज पुत्र असतील त्यांना निर्दोषपणे वाटणी मिळेल. ज्यांना पुत्र नाही अशा स्त्रिया जर सद्‌वर्तनीं असतील तर त्यांना पोसले गेले पाहिजे. मात्र त्या व्यभिचारिणी किंवा प्रतिकूल असतील तर त्यांना हाकलून द्यावे. (१६०–१६१).

विविध प्रकारचे छोटे मोठे गुन्हे केल्याबद्दल किती शिक्षा द्यावी हे ठरलेले आहे. न्यूनांग, किंवा रोगी लोकांच्या खऱ्या किंवा खोट्या किंवा भलत्याच प्रकारे जो अपमान करतो त्याला साडेतेरा पण दंड करावा (१७७–१७८). आई बहीण ह्यावरून शिव्या देणाऱ्याला पंचवीस पण

दंड करावा. ह्या शिव्या देणारा खालच्या जातीतील असेल तर निम्मा दंड करावा. फार उच्च जातीतील असेल तर दुप्पट दंड करावा (१७८–१७९). हात, पाय, डोळा, भांडी इत्यादी अवयव तोडण्याची धमकी दिली तर शंभर पण दंड करावा. ही धमकी जर एखाद्या अशक्त माणसाने दिली असली तर फक्त दहा पण दंड करावा. आरोपीने स्वतःच्या जातीच्या स्त्रियांवर राख, चिखल, माती टाकल्यास दहा पण दंड. थुंकल्यास दुप्पट दंड. ह्याच गोष्टी वरच्या जातीच्या स्त्रीबाबत केल्यास दुप्पट दंड, खालच्या जातीच्या स्त्रीबद्दल केल्यास निम्मा दंड. ह्याच गोष्टी अज्ञानामुळे किंवा दारूच्या धुंदीत केल्यास दंड नाही. ( १७८–१७९ ). सजातीय व्यक्तीचे केस, पाय, वस्त्र ओढल्यास दहा पण दंड. रक्त न येईल इतपत मारल्यास बत्तीस पण दंड. रक्त आल्यास दुप्पट दंड. ( १९२ ). एकाला जर अनेकांनी मिळून मारले असेल तर ह्याच्या दुप्पट दंड ( १९५ ). धोब्याने जर दुसऱ्याचे कपडे घातले तर दहा पण दंड ( २१२ ). औषध तूप मीठ अत्तर धान्य गूळ ह्यात भेसळ केल्यास १६ पण दंड ( २१९ ).

चोरी शोधून काढताना पुढील उपायांचा अवलंब करावा. पूर्वी अपराध केलेला, मलीन वस्त्रे नेसलेला, जात, नाव लपवणारा, द्यूत, स्त्री ह्यात आसक्त, गूढपणे हिंडणारा, जमा नसता खर्च करणारा, हरवलेल्या वस्तू विकणारा असा मनुष्य चोर असण्याची शक्यता असते ( २२९–२३१ ). चोर सापडल्यावर चोरलेला माल ज्याचा त्याला देऊन चोराला शिक्षा करावी. चोर ब्राह्मण असेल तर त्याला डाग देऊन स्वराष्ट्रातून हाकलून द्यावे. (२३२–२३३ ) घरफोडया करणाऱ्यास सुळावर द्यावे (२४१ - २४२). कुलीन स्त्री–पुरुषांची रत्ने, वगैरे चोरणाऱ्याला ठार करावे. (२४०). घर, शेत, अरण्य जाळणाऱ्याला गवताच्या आगीत जाळून मारावे (२४६ –२४७). राजाला अनिष्ट असे बोलणाऱ्याला, निंदा करणाऱ्यास, किंवा गुप्त गोष्ट फोडणाऱ्यास जिव्हा कापून हाकलून द्यावे (२५५– २५६). एखादा शूद्र ब्राह्मण म्हणून जगत असेल तर त्याला ८०० पण दंड ( २५६ ). दोषी म्हणून सिद्ध झाल्यावरही जो मी दोषी नाही असे म्हणतो त्याला मूळच्या दंडाच्या दुप्पट दंड ( २६६ –२६७ ) राजाने जर एखाद्याकडून अन्यायाने दंड वसूल केला असेल तर स्वतः ती रक्कम तीसपट करून ती वरुणाला अर्पण करून, ब्राह्मणाला दान करावी (२६७–२६८) येथेही न्यायसंस्थेचा आधार धर्म आहे हे लक्षात येईल.









## पुस्तक-परामर्श

# 'रसग्रहण' च्या निमित्ताने

केवळ काव्याचे रसग्रहण डोळ्यापुढे ठेवून प्रा. गो. म. कुलकर्णी M. A. यांनी आपल्या पुस्तकाची सुधारून वाढविलेली ही द्वितीयावृत्ती प्रकाशित केली आहे; ती अद्ययावत ठेवली आहे. तसे पाहिले तर ही आवृत्ती सुधारून वाढवलेली असे म्हणणे योग्य नाही. कारण पहिली आवृत्ती झाकून किंवा उघडून सुद्धा ही दुसरी आवृत्ती पाहिली तर ती जुन्यापेक्षा सर्वस्वी नवीन आहे हे कळून चुकते. यातील प्रत्येक प्रकरणात नवीन विवेचन आहे आणि घातलेली भरही नवीन आहे. त्यात जी कवितांची रसग्रहणे दिली आहेत तीदेखील जुनी पुष्कळशी वगळून नव्या जाणकार कवीनी व टीकाकारांनी लिहिलेली अशी नवी निवडली आहेत. शिवाय कविता कशी जन्मते याचा अनुभव म्हणून 'काही कवितांच्या जन्मकथा' खुद्द कवीनीच सांगितल्या आहेत आणि कलेच्या दृष्टीने जी तीन परिशिष्टे दिली आहेत तीही चिंतनीय आहेत. हा सर्वच भाग या पुस्तकात नवा आहे. त्याच्या वाचनाने नवी कविता अर्वाचीन कवितेकडून अधिकतर आधुनिकत्वाकडे कशी झुकली व तिचे रसग्रहणाचे स्वरूपही कसे बदलत चालले आहे याचा प्रत्यय येतो. इतकेच नाही तर रसग्रहणाची जुनी परिभाषा आणि केवळ अर्थविवरणाची चाकोरी सोडून तिच्या जागी नवा पोत, नवा घाट येऊन ते अधिक सौंदर्यलक्षी व कलासुंदर बनत आहे याचा अनुभव येतो. या दृष्टीने या पुस्तकाचे मोल नव-काव्याच्या वाचकांना व अभ्यासकांना संदर्भ ग्रंथासारखे नेहमी उपयोगी पडणारे व नित्यचलनी सुवर्णासारखे आहे. म्हणून या पुस्तकाच्या अनुरोधानेच कविता व तिचे स्वरूप, कवितेचे रसग्रहण, काव्याची कला, कविप्रतिभेतील सत्य आणि शास्त्र या किंवा यासारख्या विविध पैलूतून सूर्यकिरणातील मनोहर रंगत पाहण्यासारखी आहे.

काव्य आणि विज्ञान हे व्यक्तीचे व समाजजीवनाचे दोन नेत्र आहेत. त्यांची दृष्टी एक पण ते दिसायला वेगळे वाटतात. त्या दोघांचे लक्ष्य अद्‌भुतावर

केंद्रित असते. त्यांचा प्रभाव पूर्वापार मानवावर आहे. सृष्टीचे गूढ उकलणे आणि तीवर स्वामित्व संपादणे यासाठीच हे दोन्ही डोळे एकटक सतत पाहात आहेत. अगदी अलीकडे विज्ञानाने आपला अभ्यासविषय म्हणून आधिभौतिकाविषयीच नव्हे तर आधिदैविकाविषयीसुद्धा विचारमंथन आरंभले आहे. त्यात त्याला सर्वतोपरी यश आले नाही तरी त्याने हताशपणे अद्याप हात टेकलेले नाहीत. आपल्यापरी ते प्रयत्नवादीच राहिले आहे. काव्य मात्र पूर्वीपासून एकाच मार्गाने यात्रा क्रमित आहे. त्याचा सर्व भर अनुकरण आणि सचेतनसिद्धी यावरच आहे. कदाचित काव्याच्या प्रथमावस्थेतील ही शोधाशोध असेल. परंतु काव्य हे यथार्थ ज्ञानसंपादनाचे एक संभवनीय साधन आहे असे तेव्हापासून आतापर्यंत सुजाण मानवाला वाटत आले आहे. मराठी पुरता विचार करायचे तर, ज्ञानेश्वर चक्रधरापासून तो अरविंद– गुरुदेवापर्यंत सर्वसकलसंत हाच मार्ग चोखाळत आले, उलट विज्ञान हे कितीही दृक्प्रत्यय देत असले तरी त्याचे हात अजूनही स्वर्गापर्यंत वर पोचले नाहीत. सृष्टीचे गूढ उकलताना त्याला काव्याचेच सहोदरत्व पतकरावे लागते. त्याबाबत त्यांचा अविरोध नसला तरी त्या दोघामध्ये परस्पर सहकारिता आहे. तेवढ्यापुरते का होईना या नवतेच्या ज्ञानमार्गीयांना काव्याचे ज्ञानातील स्थान व कर्तृत्व यांचा विचार करणे क्रमप्राप्त आहे. ज्ञानसाधनेच्या दृष्टीने कवी आणि शास्त्रज्ञ यांची मानसिक कार्यप्रवणता एका विशिष्ट पातळीवर आल्यानंतर ती एकाच प्रकारची आहे याचा पडताळा पटतो, आणि असा क्षण म्हणजे कविप्रतिभेचे उड्डाण आणि शास्त्रज्ञाला शोध लागण्यापूर्वीची वेळ आणि तो शोध घेताच होणारा आनंद यामधे दिसून येतो.

अनेकांची अशी समजूत आहे की काव्याची संकल्पना साध्य आणि साधन अशी दुहेरी असते. स्वतः कवीला विचारले तर तो काव्य हे काव्यासाठीच असते असे झटकून तोडून टाकतो. पण मनातून आपल्या कवितेचे चीज होत नाही अशी त्याला हळहळ असतेच. कविता अशी असावी, ती तशी नसावी हे सांगणारे तुम्ही कोण ? असे केशवसुत कितीही डाफरून बोलोत पण आपल्या पोटातली मळमळ बाहेर काढून टाकताना गयावया करून 'कवितेचे प्रयोजन' गळी उतरवू पाहताना दिसतात. त्यातील काव्याचे उपयुक्ततावादी प्रयोजन पाहून कवी रसिकापुढे टीकाकार आणि समाजासमोर नरमलेला दिसतो. त्याची पहिली भूमिका बदलली याची जाणीव होते. एका बाजूने त्याचे गाऱ्हाणे आहे ते "द्या उत्तेजन हो कवीस, न करा गाणे तयाचे मुके" असे आहे तर

दुसऱ्या बाजूने "आम्हाला वगळा –विकेल कवडी मोलावरी हे जिणे" असे आत्मप्रौढीच्या ऐटीत 'आम्ही कोण ?' चे उपयोजन आहे. कवीचे हे धोरण उपयुक्ततावादी तर खरेच पण ते ठाम नाही, डळमळणारे आहे. 'स्फूर्तीच्या तुमच्या पिढीस पुढल्या साक्षी कवी होईल !' हा कवीचा आशावादसुद्धा भवभूतीच्या 'कालोह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वी' इतकाही दमदार नाही. 'आम्ही असू लाडके देवाचे' हे देवाशी सोयरीक जमवणारे नातेही निसटते वाटते. कवी निःसंशय 'आहोत' असे सांगत नाही. म्हणजे कवितेचे कूट सोडवताना ती नीतितत्त्वापासून लांब आहे की प्रादेशिक प्रत्यक्षतेपासून दूर आहे ? धर्मोपदेशापासून ती अलिप्त आहे की विज्ञानाशी फटकून आहे ? याचा विचार न करता तीमध्ये सौंदर्याचा अंश किती आणि टाकाऊ भाग किती यावरच काव्याच्या यशाचे मोजमाप करावे लागते. शास्त्राचेही असेच असते. त्याला वाटते, विश्वाचे ज्ञान करून घ्यायचे असेल तर त्याने बुद्धीचीच कास धरली पाहिजे. सत्य समजून घ्यायचे असेल तर विज्ञानाखेरीज दुसरा राजमार्ग नाही. कारण अंतिम निर्णय देणारी प्रेरणा नसून प्रज्ञाच असते. विज्ञान हा सूर्य आणि हा जयद्रथ असे रोखठोक आहे, त्याला घटनेतील सुसंवाद आणि सौंदर्य पाहून काव्याप्रमाणे नुसते मानसिक समाधान मिळवावयाचे नसते तर एकूण नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञेचेही मूळ शोधावयाचे असते.

परंतु शास्त्रज्ञांचे हे म्हणणेदेखील तितकेसे खरे नाही. रसग्रहण हे निव्वळ आशयवादी नसते. किंवा निखळ अभिव्यक्तिवादी नसते, ते नेहमी परस्परांच्या हस्तांदोलनाने आपला आनंद व्यक्त करीत असते. या दृष्टीने कुसुमावती देशपांडे यांनी 'आम्ही कोण ?' या कवितेचे केलेले विश्लेषण विशेष चिंतनीय आहे. त्या लिहितात "मानवी जीवनाच्या प्रत्येक अंगोपांगात प्रतिभेचा आविष्कार होऊ शकतो, एखाद्याच विभागात होतो असे नाही. अशा विविध प्रकारांनी तिचा आविष्कार होईल तेव्हाच जीवन समृद्ध, सुखी व उदात्त होते. चैतन्यदायी काव्य, भव्य शिल्पकला, उदात्त संगीत यांनी जीवनाची पातळी उंचावली जाते तशीच विशुद्ध तत्त्वज्ञानाने, धीट विचारसरणीने व निःसंग आत्मनिरपेक्ष कृतीने. या सर्व गोष्टींच्यामागे प्रतिभेचे स्फुरण असते. त्या प्रतिभेशिवाय संभवत नाहीत. असामान्य मर्मग्राही दृष्टीवर या सर्व अवलंबून असतात. त्या दृष्टीमुळे क्षणिकाच्या पलीकडच्या सातत्याची जाणीव होऊ शकते– त्या दृष्टीला जीवनाच्या गाभ्यातला मानव्याचा व सौंदर्याचा अंतःप्रवाह दिसू लागतो. नवीन समाजाच्या रचनेच्या अंतःशक्तीचे त्यादृष्टीला आकलन होते. ही दृष्टी ज्यांना लाभली त्यांनाच पृथ्वीचा सुरलोक बनविण्याची खटपट करण्याचे चैतन्यही लाभते." (रसग्रहण पृ. १४०)

हे प्रतिभावंत, Man of Genius म्हणजे ‘ क्षणात नाहीसे होणारे दिव्याभास पकडून ठेवणारे ’ विज्ञानपंडित आणि कवीच नव्हेत काय ? किंवा ज्ञानेश्वरांच्या शब्दात सांगावयाचे तर ‘ तिते सिद्ध प्रज्ञेचेनि लाभे — मनचि सारस्वते दुभे ’ असे म्हणता येईल. याचा अर्थ असा नव्हे की सिद्ध प्रज्ञेचा काव्याशी काही संबंध नाही. तो जरूर आहे परंतु प्रत्यक्ष आणि त्याचा भास यामधे जे नाते असते तेच वास्तव आणि वास्तव काव्य यामध्ये आहे. कवीचा वास्तवभास ही अनुभूतीची नवजागृती आहे. म्हणजेच एकप्रकारे शास्त्रीय ज्ञानाचे ते उगमस्थान आहे. आधी रामायण मग राम, आधी विमानाची कविकल्पना मग विमानाचा संचरण नि विहरण अशासारखा तो संबंध आहे. आज गणिताने आणि शास्त्रीय शोधाने उमगणारे विश्वाचे जगड्व्याळत्व आणि कोडे हेसुद्धा याच शास्त्रज्ञांच्या कल्पना किंवा तर्क नव्हेत काय ?

काव्य हे जीवनाचे साध्य ठरण्याची कल्पना सोडली तरी ज्ञानसाधनेचे एक साधन म्हणून त्याकडे पाहता येईल. हे ज्ञान कोणत्या प्रकारचे आहे याचा विचार केला तर काव्य ही कवीच्या मनोजीवनाची सूक्ष्म जागृती आहे, प्रखर प्रेरणा आहे असे म्हणता येईल. अर्थात ही मानसजागृती किंवा अंतःप्रेरणा म्हणजे अनुभूतीच असते. तिला इतिहासातील अनेक दाखले देऊन किंवा घटनांचे दृष्टांत देऊन फार तर वर्गीकरण करता येणार नाही पण तिच्या विधिनिषेधांचे आणि यमनियमांचे वर्गीकरण करून ज्ञान मिळविणे शक्य आहे. काव्य निर्दिष्ट झालेले प्रसंग वा घटना आणि व्यवहारात दिसून येणारे घटनाप्रसंग मूलतः एकाच जातीचे असतात, म्हणून ते संभाव्य ठरतात. प्रत्यक्षावरून रसिक त्या अद्‌भुततेला मान्यता देतो. किंबहुना स्वतः कवी हासुद्धा मूलवस्तूचा, – निसर्गाचा – जाणकार असल्यामुळेच ती अद्‌भुतता त्याला प्रतीत झालेली असते, म्हणून तो ती काव्यात उतरवू शकतो. त्याची गती अपूर्णाकडून पूर्णाकडे असते, अमंगलाकडून मंगलाकडे असते, क्षणिक टाकून शाश्वत स्वीकारात असते. सर्व सत्प्रवृत्त कृतींचा परिणामही अंती अशाच कृतीत दिसतो. ज्ञानेश्वरांच्या सारखा अव्वल दर्जाचा प्रतिभावन्त “ वाचें बरवें कवित्व । कवित्वीं रसिकत्व । रसिकत्वीं परतत्त्व । स्पर्शू जैसा ।। ” हाच अनुभव वेगळ्या प्रकारे सांगत नाही काय ? किंवा Poesy serveth and conferreth to magnanimity, morality and delectation हा इंग्रज विचारवंत बेकन याचा अनुभव तरी दुसरे काय सांगतो ? या दोघांच्या मनोभूमिकेचा प्रत्यय म्हणजे त्यांच्या

आंतरिक वास्तवाचा वेध नव्हे काय? 'रसग्रहण' पुस्तकातील नवी जुनी आशयवादी परीक्षणे किंवा आधुनिक सौंदर्यवादी रसिकांनी केलेली अभिव्यक्ती ही याच एका तत्त्वाधारे केलेली दिसून येतात. काव्याच्या आकलनाचे एक अंग-'काही कवितांच्या जन्मकथा' हे परिशिष्ट –प्रस्तुत ग्रंथकर्त्याने दिले आहे. 'त्यावरून खुद्द कलावंतालाही स्वनिर्मितीचे रहस्य आकलन दुर्लभ असते' असा कविमनाच्या एरिअलवरून ठाव घेतला आहे, तो या परिशिष्टापुरता बराचसा खरा असला तरी तो सार्वजनीय नव्हे. हे 'रात्रभरी' कवितेचे प्रा. पु. शि. रेगे यांनी हरिमंदिर उभे केले आहे त्यावरून उघड होईल; आणि रेगेही ज्ञानेश्वर–बेकनांचीच वाटचाल करीत असलेले दिसतात. (पृ. २५४–५६) कदाचित् इतर निवेदकांना आपल्या चिद्घनचपलेचे असे छायाचित्रण जमले नसेल किंवा त्यांच्या तत्कालीन स्मृतीवर त्यांना ताण देऊन ती उभी करावी लागली असेल किंवा असेच दुसरे काही कारण घडून त्यांना आपल्या कवितेची जन्मकथा रंगवावी लागली असेल! तरीदेखील भूतकाळात विरलेल्या त्या तेजोवीणेच्या रागदारीचे सूर कशा प्रकारचे असावेत याची स्थूल कल्पना त्यावरून येतेच.

मनुष्य जेव्हा एकाद्या गोष्टीवर मनापासून प्रेम करतो आणि तिच्या सहवासात आपण किंवा आपल्या सहवासात ती नेहमी असावी असे इच्छितो तेव्हा ती बाब विनाशी आहे की अविनाशी आहे याचा तो कधी विचारच करीत नाही. त्याला इतकेच हवे असते की आपल्या अंतःकरणाला होणाऱ्या वेदना ज्यामुळे कमी होतील, नाहीशा होतील तिच्या छायेत आपण असावे. यालाच ज्ञानेश्वर 'परतत्त्वी स्पर्श' म्हणतात किंवा वेदान्ताच्या परिभाषेत 'आत्म-विमोचन' म्हणता येईल. आजच्या अत्याधुनिक भावने याचा प्रकृत विषयापुरता विचार करता कवितेचे सौंदर्य कला, काल आणि कालातीत सातत्य यांचा शोध घेणारे एक तत्त्व मानले आहे. या दृष्टीने 'आवर्तने द्रुत शून्याची...' या अत्याधुनिक कवितेच्या रसग्रहणात (पृ. २२६–२७) चंद्रकान्त देशपांडे लिहितात "तर्काच्या क्षेत्रात कधीही सामावून न देता येणारा पण ज्याचे अस्तित्वही नाकारता येणार नाही असा हा अनुभव या कवितेत फार समर्थपणे व्यक्त झाला आहे. विचार-भावना यांच्याही बुडाशी कुठेतरी असणाऱ्या रहस्याकडे लागलेला या कवितेचा रोख एक अपरिहार्य अशी अनिश्चितता आणि धूसरता घेऊनच येतो. त्यामुळेच कविता समजल्यानंतरही न समजता केवळ जाणवूनच घेता येईल असे कवितेचे फार मोठे तत्त्व उरते. आरती प्रभूंच्या अनेक चांगल्या कवितांचे हे महत्त्वाचे वैशिष्ट्य या कवितेत विशेष जाणवते." किंवा कवि

अरुण कोलटकर यांच्या ‘विजयाच्या टपावर...’ भाष्य करताना अनिल डांगे लिहितात, “सबंध कवितेत निर्माण होणारी जाणीव एक फार मोठे वास्तव जीवनातले सत्य सांगून जाते. यातली ‘राजा’ ‘पताका’ ‘द्रोण’ ‘आंबील’ ‘चिलखत’ ही सगळी प्रतीके कविता फार मोठ्या तत्त्वज्ञानाच्या पातळीवर नेतात, अन् त्याचवेळी सबंध रचनेला अतिशय सुरेख अशी कलात्मक पातळीही लाभलेली असते.” (पृ. २३९). सांगायचा मतलब असा की कवीचा संस्कार, अनुभव आणि दर्शन ही ज्या प्रमाणात काव्याचा कलात्मक आकृतिबंध तयार करू शकेल त्या प्रमाणात त्याचा भलेबुरेपणा टिकून राहील. ज्या दर्शनाने कवी निर्भर होतो तो संस्कार घेऊन ते दर्शन वाचकापर्यंत पोचवितांना कवीला आपली कला रसवत्तेच्या प्रांगणात पणाला उभी करावी लागते. तिच्यासाठी कवीला कित्येक दिवस सतत जागृत राहावे लागते, संशोधन करावे लागते, व मूर्ती आकाराला येण्यासाठी विचार-भावनांची आतडेतोड करावी लागते. अशी रक्त आटवणारी तपस्या करूनही प्रत्येकाला यश लाभतेच असे नाही. एखादा महानोर किंवा एखादा पु. शि. रेगे सारखा आधुनिक कवी थोडे फार यश गाठी बांधतो, बाकीचे कलाकार हे कारागीरच ठरतात; हे जाणूनच रसग्रहणकार ‘काही कवितांच्या जन्मकथा’ देण्यापूर्वीच्या प्रास्ताविकात म्हणतात “नित्य वा नैमित्तिक, सामान्य वा विशेष जीवनानुभव चलित होऊन त्यांचे नाद, रूप, रस, गंधात्मक रसायन केव्हा आणि कसे सिद्ध होईल, अवतरेल याचा नेमका अंदाज कोणाला बांधता येत नाही.”

कला ही एकमेवतेशी (uniqueness) निगडित असते तर ज्ञान हे वस्तुजाताशी जखडलेले असते, यामुळे एकमेवता ही दुःखात्म नसते. ती आनंददायी असते. चांगला कवी एकात्मतेकडे धाव घेतो, त्याची कविता कलात्म असते व आनंद देते. ती वस्तुजातातील एकात्मता सूचित करते. जडाजड वस्तुजातातील एखाद्या वस्तूचे, व्यक्तीचे किंवा घटनाप्रसंगाचे छायालेखन करण्यापेक्षा त्या सर्वांमधून जी मनोवृत्ती तयार होते ती व्यक्त करण्यातच कवीची खरी कसोटी असते. ती ज्याला साधते तोच महाकवी होतो. शाकुंतल नाटकातील चौथ्या अंकापैकी चार श्लोकच जगातील साऱ्या रसिकांचा चित्तवेध घेतात आणि एकच पौंड मांस मागणारा व्हेनिसचा व्यापारी जसे सूडातील समाधान मिळवू पाहतो, त्याचप्रमाणे त्याची निर्घृण कृतीसुद्धा तितक्याच समधात वृत्तीने रसिक समजू शकतो. तेव्हा अशा प्रकारच्या कवीच्या व्यापारातूनच जगाला शास्त्र ज्ञान प्राप्त होते. पळत्याच्या मागे लागणारे प्रेम अशा प्रकारे

ताजमहालात आकारलेली कला बनते. मानसातील ही अंतःसंवेदनेची लहरी कवितेच्या काठावर विसावते. किंवा तटस्थपणे काठावर बसलेल्या समीक्षकाच्या पायापर्यन्त पोहोचते. म्हणूनच कलेच्या द्वारे कवितेचे इंगित टीकाकार जाणू शकतो आणि कवितेतील आवर्ताचा मूलबिंदू तो बरोबर पकडू शकतो.[१] या प्रकरणी 'रसग्रहण' कारांचे १० वे व २ रे ही प्रकरणे वाचकाना बरीच उद्‌बोधक होण्यासारखी आहेत. त्यातही "Poetry is not to be explained, it is to be understood." या तत्त्वाप्रमाणे या समुद्रात निमज्जन करून कृतार्थ होणे हाच खरा मार्ग आहे; कलेप्रमाणे तिचे रसग्रहणही आत्मनिष्ठ व विविधरंगी असल्याने तिचे संपूर्ण पैलू प्रकाशित करणे शक्य नाही. मुक्तीचा मार्ग जसा ज्याने त्यानेच शोधावयाचा असतो; त्याप्रमाणेच कलाब्रह्माचा साक्षात्कारही ज्याने त्यानेच अनुभवायचा असतो. यासाठीच काव्यानंदाला 'ब्रह्मानंदसहोदर' असे म्हणतात. 'उद्धरेत् आत्मनात्मानम्' हा सिद्धांत अध्यात्मापुरता मर्यादित नाही, तो सर्वव्यापी आहे" हा निर्णय मान्य होण्याजोगा आहे. (पृष्ठ १३४–३५) यासाठीच मौनाचेही निनाद उठवू पाहणारी प्रतीकात्मक नवकविता अनेकांना दुर्बोध झाली आहे. आणि ती प्रतीकेही अशी दुर्गम की ती उलगडून सुगम केल्याखेरीज कळूच नयेत. याबाबत व्हाइटहेड नामक एका गणिती विद्वानाचे विचार ध्यानात घेण्यासारखे आहेत. तो म्हणतो, "Great art is more than transcient refareshment. It is something which adds to the permanent richness of the soul's self attainment. It justifies itself both by its immedate enjoyment and also by its discipline of inmost being. Its discipline is not distinct from enjoyment, but by reason of it ... The fertilisation of soul is the reason for the necessity of art".

---

१. "कला व रसिक हे दोघेही परस्परानुवर्ती असतात. दोघेही रसयात्री किंवा आनंदप्रवासी या नात्यानेच कलाप्रांतात वावरत असतात, असावयास पाहिजेत. या दोघांच्या प्रवासाची दिशा एक नसते इतकेच. कलानिर्मितीमध्ये कलावंत हा मूळ एका ठिकाणाहून निघून दुसऱ्या एका बिंदूपर्यन्त पोहोचतो तर रसिक हा त्या बिंदूपासून उलटचा क्रमाने कलावंताच्या मूळ ठिकाणाला जाऊन भिडतो. जेथे कलावंताचे कार्य संपते तेथे रसिकाच्या खऱ्या कार्याला प्रारंभ होतो."– रसग्रहण पृ १३.

आजच्या वीजवापराच्या विज्ञानयुगात अनेकविध पेशी, जिवाणु, अणु-रेणु-परमाणू इत्यादी अति सूक्ष्म गोष्टी सूक्ष्मदर्शक यंत्राखाली मापता आल्या तरी विद्युदणु, अणुविभाजन, आकाशवाणीचे श्रवण आणि दर्शन प्रत्यक्ष घडत असले तरी त्याच्या क्रियाप्रतिक्रिया ज्या शक्तीने घडतात ती माणसाला पाहणे सामान्यतः शक्य नाही. त्या त्याला अतींद्रिय विचाराप्रमाणेच नुसत्या कल्पनेच्या गणिताने जाणून घ्याव्या लागतात. आजचे विज्ञान हे या प्रकारे रसग्रहणाला जवळ येत असूनही ते त्या कवितेच्या केंद्रापर्यंत, चिद्घनचपलेच्या आदिप्रेरणेपर्यन्त अद्याप पोचले नाही किंबहुना पोहोचणारही नाही हे मान्य करण्यात कोणताच कमीपणा नाही. तेवढ्यापुरते, काव्यकंद अजूनही विज्ञानाला अतींद्रियच आहे. म्हणूनच कवी आणि रसिक हे दोघेही निसर्गाचे, नियतीचे, व पारलौकिक तत्त्वांचे उपासकच राहिले आहेत हे उघड आहे. जान्सनचा विचार असा : "It becomes profitable to regard art science as each attemting to communicate mental images through patterns and structures & forms, in the qualitative domain and in the quantitative domain of measurement respectively."

कवितेची जन्मकथा सांगणाऱ्या कविवरांच्या निवेदनात एक गोष्ट स्पष्ट दिसते ती ही की कविता लिहिण्यापूर्वी कवीच्या मेजावर कोरा कागद होता. मात्र तो चांगदेवाचा नव्हता. त्यात भांबावलेपण नाही की अज्ञानही नाही. तेथे काहीतरी जाण आहे. ती जाण, जिज्ञासा, हुरहूर की प्रेरणा त्याला काय म्हणायचे ते त्यांना माहिती नसते. त्याचे ते भान अज्ञानातील भ्रमंतीसारखे किंवा अंधारातील चाचपडण्यासारखे काहीतरी असते. त्यावेळी त्याच्या डोक्यातील विचाराला अथवा अंतःकरणातील भावनेला कसलाच आकार नसतो, भाषेची पालवी फुटलेली नसते पण आतल्या आत काहीतरी सळसळत असते आणि एकाएकी उद्रेक होऊन त्या खळबळीला वाचा फुटते. त्या उन्मेषाला श्लोकत्व येते. त्यायोगे सूर, शब्द आणि अर्थ ही एकदमच बाहेर पडतात. बाहेर पडलेल्या त्या भावभावनेला आकार आणण्यासाठी कवी त्यावर टाकी चालवून संस्कार करतो. त्यामुळे त्या उमळीला वजन, तोल आणि गती प्राप्त होते आणि काव्याचा घाट तयार होतो. कवीच्या त्या अनुभूतिसागरात कधी कवीच्याच आत्मस्मृती गळाला लागतात तर कधी त्याच्या परिवारातील जीवनछाया अडकतात. एखादेवेळी रिकामाच गळ आकाशात उडवला जातो नी

पुन: तो पाण्यात बुडी मारतो. अशावेळी त्याची संवेदना त्याला फसवते आणि ती मृतजात बालकाप्रमाणे सचेत होऊ शकत नाही. मग त्याने पचवलेले विचार, अर्धवट उमटलेली भावना किंवा नुसतीच तोंडपाटीलकी केल्याप्रमाणे होते. अर्थात् हे सर्व त्याला फेकून द्यावे लागते आणि हा सारा खटाटोप किंवा बौद्धिक खेळ होऊन विनाकारण सायास मात्र घडतात. प्रा. युंग ज्या निष्फळ सायासांना संशय, संभ्रम, असे नाव देतो ते संशय कवीला आपल्या काळच्या भाषेत मांडावे लागतात. नाहीतर तो पृथगात्म ठरत नाही. आपण जुन्यापेक्षा वेगळे आहोत, आपल्यामधे नवीनता आहे हे दाखवण्यासाठी तो जुने संकेत, जुनी भाषा, जुनी पद्यरचना कधीही स्वीकारीत नाही. त्यामुळे जुन्याची शान नाही व नवे सृजन नाही अशा परिस्थितीत उतरलेली कविता अधिकाधिक दुर्बोध होते. याकडे या कारागिरांचे दुर्लक्ष होते. स्वत:चे एकमेवत्व उठून दिसावे एवढाच एक हेतू त्याच्या डोळ्यापुढे असतो. ही वृत्ती साहित्याच्या दृष्टीने धोकादायक ठरते. सध्याची बरीचशी कविता या वळणाची आहे.

कानाच्या रचनेबरहुकूम ग्रामोफोन केलेला असो की कॅमेरा डोळ्यावरून बनवला असो, घड्याळाची मांडणी शरीरातील संवेदन व्यवस्थेप्रमाणे झाली असो नाहीतर मानवी मेंदूचे कार्य दूरध्वनी संयोजकाच्या कामानुसार चालत असो विज्ञान हे ज्ञाताकडून अज्ञाताकडे जात आहे हे कोणालाही कबूल करावेच लागेल. त्याच्या कल्पनेची आणि विचारांची दिशा त्यावरून समजते; परंतु विज्ञानाने उपमादृष्टांतांचा आश्रय केला म्हणजे सत्यशोधनात त्याने हात टेकले असे होत नाही. एखाद्या वस्तूचे ज्ञान होणे आणि ती समजून घेणे या दोन्ही क्रिया वेगळ्या आहेत. त्यातील फरक लक्षात घेऊनच अंदाज बांधावे लागतात. काव्याच्या भाषेत फार तर असे म्हणता येईल की कवी आणि शास्त्रज्ञ या अंदाजबांधण्याच्या चव्हाटयापर्यंत एकाच सत्यसंशोधनाच्या मार्गावरून चालत होते. तेथपर्यंत कवीच्या कल्पनेची भरारी आणि शास्त्रज्ञांच्या बुद्धीची झेप ही एकाच उद्दिष्टाने घडत होती. फक्त शास्त्रज्ञ हा कोणत्याही प्रकारे रंगसफेती न करता जसे दिसेल तसे सांगत राहिला आणि कवी बुद्धीची काटछाट करीत, भावनेच्या वारूवरून विहार करीत हवेतच किल्ले बांधू लागला. त्यामुळे त्याची भाषा रूपकाश्रयी झाली. त्यामुळे विज्ञानाची नवी वाटचाल त्याच्या प्रतिभासृष्टीत अवतरणे अपरिहार्य आहे. ती समजून घेतली तरच नवकविता सुलभ होईल.

एकाद्या म्हाताऱ्याने 'डुकृञ्' 'डुकृञ्' असा व्याकरणपाठ घोकताना पाहून शंकराचार्यांचे कविमन जागृत होते किंवा एकाद्या बालकाने त्यांना चकित

करण्यासारखे चटपटीत उत्तर दिले तर ते त्यांचा काव्यविषय होऊ शकते. त्याचप्रमाणे 'हिंदुस्थानातील आर्य लोकांचा वर्ण : राजवाडे लेखसंग्रह, संपादक लक्ष्मणशास्त्री जोशी' असे लांबलचक शीर्षक वागवणारी कविता विलास सारंगाना ते पुस्तक वाचून सुचते. यात नावीन्य किंवा वैचित्र्य नाही. तो केवळ कालमहिमा आहे. पाण्याच्या पातळीप्रमाणे कवीची ही एक मानस-पातळी असते. ती सर्वकाली आणि सर्वठिकाणी सारखीच असते. याचेच ही उदाहरणे एक गमक आहे. तेथे मानवी मन आणि निसर्ग ही अन्योन्यांना आलिंगून असतात. तेथील जीवन सहज आणि निरलंकार असते. तेथे मानव हा निसर्गाला उघडावाघडाच पाहतो. त्यामुळे इतरत्र न दिसणारी वास्तवता एखाद्या बालकवी-लाच 'औदुंबर' कवितेप्रमाणे साकारता येते. तिथे घनता, प्रवाहिता आणि वायुरूपता ही कोंदणात बसविल्याप्रमाणे निसर्गसौंदर्य खुलून खुलवून वाढवीत राहतात. कवी, शास्त्रज्ञ आणि रहस्यभेद करणारा योगी यातूनच जगाच्या कल्याणाच्या चिजा बाहेर काढून जगाला देत असतात असे सांगणारी केशवसुतांची कविता[१] ही 'कवितेची जन्मकथा'च सांगत नाही काय ? अनंत कोटी ब्रह्माण्ड-नायक किंवा सूर्यकोटी समप्रभ असे केवळ प्रतिभेने पाहणारा कवी आणि अखिल विश्वामधील अनेक आकाशगंगा आणि त्या गंगेत गगन वितळवून टाकणारे अनंत सूर्य यांचे बिनचूक गणित वर्तविणारे विज्ञानशास्त्री एकमेकांना सावरून घेत असलेलेच दिसतात. त्यांचे प्रातिभ दर्शन हे केव्हाही आनंद-दायीच असणार. इतकेच नाही तर त्या दोघांच्या शरीरामधे ज्या अब्जावधी जीवपेशी आहेत त्याबद्दल दोघांचेही एकमत आहे. हे जैविक सत्य स्वीकार-ताना यापैकी कोणालाही देह नाशवन्त आहे हे मत टाकावू वाटत नाही. आपल्या देहात असे अब्ज अब्ज जीव आहेत याचे त्यांना भय नाही उलट ते वास्तव आहे असेच ते मानतात. न्यूटनने वाळूच्या कणाप्रमाणे मानलेले आपले ज्ञान आणि ब्रह्माण्डाला व्यापणारे सच्चिदानंदमय बिंदुले ही एकाच मातेची मुले होत. येथे मला एक लहानपणी ऐकलेली कणिका आठवते :

"मोहोर म्हणाला "आले, अगदी जवळ आले.
आता माझ्या ओटी पोटी फळेच फळे !"
आम्र म्हणाला 'छे ! किती दूर ! अजुनी आहे उशीर'
मला वाटे धन्य धन्य ! सुमदृष्टी असेल तर !"

—कृ. बा. मराठे

# ' रेणू 'च्या निमित्ताने

सन्माननीय लेखक श्री. पु. शि. रेगे यांना —

तुमची नुकतीच प्रसिद्ध झालेली तिसरी ' रेणू ' कादंबरी वाचून संपवली. सावित्री, अवलोकिता या दोन कादंबऱ्या जशा मराठी कादंबरीची परंपरा रुंदावणाऱ्या आणि ताठर झालेले साहित्याचे प्रकार परस्परात कालविण्याच्या बाबतीत यशस्वी ठरलेल्या आहेत; तशीच रेणू देखील मराठी कादंबरीत तिच्या अंगभूत वेगळेपणामुळे चटकन वेगळी जाणीव करून देणारी आहे. सावित्रीत एका कलासक्त, अनामिक आतुरतेने भारलेल्या स्त्रीच्या प्रीती आणि भक्ती या दोन भावनांच्या मिश्रणाला तुम्ही स्नेहाच्या आणि अनामिक संबंधाच्या अधिष्ठानावर साकार करून कादंबरीचा परंपरागत साचा कमालीचा लवचिक बनविला होता; तर अवलोकिता या कादंबरीत विविध पातळींवर तरलतेने तरळून जाणाऱ्या संमिश्र संवेदनांची गुंतागुंत भ्रमरांच्या थव्याप्रमाणे नायकाच्या मनात कशी घोंगावते यांचे चित्रण तितक्याच हळूवारपणे चित्रित केलेले होते. त्याचप्रमाणे मानवी जीवनाला लालिमा व लालित्य आणणाऱ्या प्रीतिभावनेच्या नानाविध संवेदनांच्या संमिश्र छटा आज अनेक काव्यांतून जशा प्रत्ययाला येतात; तशा प्रीतिभावनेच्या विविध रंगी, तरलतम अन् सूक्ष्म पातळीवर विहार करणाऱ्या भावछटा या तुमच्या तिन्हीही कादंबऱ्यांत आविष्कृत झालेल्या आहेत. आपल्या सावित्री व अवलोकिता यांच्यावर खूप लिहून झालेले असेल; बोलून झालेले असेल मी मात्र ' रेणू ' ही आपली कादंबरी वाचल्यावर मनावर उमटलेल्या कलात्मक प्रतिक्रिया या छोटयाशा पत्ररूपी लेखात नोंदविण्याचा प्रयत्न करणार आहे.

रेणू ही या कादंबरीची नायिका भासत असली तरी ती काही नायिका नव्हे. ती तिच्याच जीवनाची कहाणी नाही असेल तर थोडीशी आतंरजीवनाच्या विकासाची! रेणू बरोबर आपल्या कादंबरीत अनेक पात्रे आलेली आहेत प्रमिला, चौधरी, पौर्णिमा, जानकी, लोरेंझो आणि किरकोळ स्वरूपाची बरीचशी! ' रेणू ' ही या साऱ्यांच्या ' आन्तर ' जीवनाची परस्परांच्या भाव जीवनाच्या धाग्यांना कुणी– किती आधार दिला अन् घेतला या सर्वांची ही कादंबरी वाटते. म्हणजे रेणू कादंबरीत एखाद्या स्त्रीच्या जीवनातल्या घटनांचा पट उलगडून दाखविणे आपणास अभिप्रेतच नव्हते हेच यातून स्पष्ट होते. त्यामुळेच या आपल्या कादंबरीत घटना आहेत. तरीही ती घटनाप्रधान, कालानुक्रमी आणि जन्म-मृत्यूच्या दोन अपरिहार्य टोकात खेळणाऱ्या प्रसंगांची ' योजलेली ' मालिका वाटत नाही. आपल्या कादंबरीत ज्या ज्या घटना आपल्या नेहमीच्या धूसर, काव्यात्मक आणि अनेक सूचक अर्थी भाषेतून व्यक्त झालेल्या आहेत. त्यांचा वाचकांच्या मनावर ठसा उमटलाच पाहिजे; आपली भूमिका येथे थोडी-

देखील जाणवत नाही. घटनांच्या भाराखाली भावनांचा ओलावा निर्माण करून त्यात वाचकांना तृप्त करण्याची ढोबळ पद्धती येथे बिलकूल आढळत नाही. आपल्या कादंबरीत रेणूच्या भावजीवनाशी अत्यंत जिव्हाळ्याने निगडित असलेल्या दोन घटना चित्रित केलेल्या असूनही त्यांचा म्हणून खास प्रभाव वाचकांच्या मनावर उमटत नाही. पहिली घटना म्हणजे तिच्या पिताजींचा मृत्यू आणि दुसरी घटना म्हणजे मावशीचा-प्रमिलाचा आकस्मिक झालेला मृत्यू ! या दोन मृत्यूंच्या चित्रणात घटनाप्रेमी लेखकाने भरपूर भाष्य करून सोडले असते. आपण मात्र यांना जीवनातल्या स्वाभाविक आणि अपरिहार्य अशा अवस्था मानून त्या दोन घटनांचा संबंधित पात्रावर काय भावनिक परिणाम झाला हेच दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. एवढेच नव्हे तर आपण आपल्या या कादंबरीत सर्व प्रकारच्या घटना चित्रित केलेल्या आहेत; त्या साऱ्या प्रवाही स्वरूपाच्या असल्याने त्यातूनच आपणाला जीवनाचे प्रवाहीपण वाचकांना प्रतीत करून दाखवावयाचे असावे.

आपण घटना आणि पात्रे निवडतानाही खूपसा वेगळेपणा दाखवलेला आहे. पात्रांची निवड, संगती आणि विसंगती याच्यातून साधलेली आहे. तीच गोष्ट घटनांच्या निवडीबाबत झालेली आहे. प्रसंगाच्या संगती-विसंगतीतून तुम्हाला जीवनातली 'वरवर' भासणारी 'संगती' आणि 'आतली' संगती एकाच वेळी उभी करावयाची होती की काय हे समजत नाही. त्यामुळे आपल्या रेणू कादंबरीत प्रसंगांचे ताण-तणाव न जाणवता स्त्री आणि पुरुष यांच्या नैसर्गिक फरकातून व आकर्षणातून निर्माण झालेले आणि त्याचप्रमाणे मानवा-मानवामधील ताण-तणाव हेच वाचकांच्या मनावर अधिक सखोलपणे उमटतात, अर्थात घटनांची अभिव्यक्ती एखादा लेखक कोणत्या पद्धतीने करतो यावर त्याचे व त्याच्या लेखकाचे श्रेष्ठत्व अवलंबून नसते; आपल्या या 'रेणू' मध्येही घटनांच्या माध्यमातून– संगती-विसंगतीच्या पडच्छायेतून उमटणारे मानवी संवेदनांचे जाळीदार चित्रच आविष्कृत करण्याचा प्रयत्न केलेला आहे. म्हणून हे एक प्रथमदर्शनी जाणवणारे वेगळेपण म्हटले पाहिजे.

एखाद्या ( वाचकप्रिय ) उदात्त भावनेचे अधिक उदात्तीकरण करणे हा एक कादंबरीच्या लोकप्रियतेचा विशेष होत चाललेला आहे 'रेणू' कादंबरीत अशा कोणत्याच एका भावनेचे सलग, स्पष्ट आणि ठोस चित्रण आढळणार नाही. कुणाला हा दोषही वाटेल; पण आपल्या लेखणीची भिस्त मानवाच्या स्थूल भावनांचे चित्रीकरण करण्याऐवजी त्याच्या आत किंवा त्याच्या पलिकडे जाऊन तळ शोधता आला तर पहावा हा असतो. संवेदना, त्यालाही एकच रंग येऊ न देता अशा संवेदनांची गुंतावळ

आपण स्वाभाविक मनोविष्कारातून व्यक्त करतात. एखाद्या पात्राची-विशेषत: चौधरीची उदाहरणादाखल घेतली तर संवेदना म्हटली तर मैत्रीची आहे, स्नेहाची आहे, शारीर आकर्षणाची आहे किंवा जीवनाच्या एकलेपणावर शोधलेला उपाय म्हणून स्वीकारलेल्या सहवासाची असेल. पण आपल्या पात्रांच्या मनात थैमान घालणाऱ्या संवेदना-भावना यांना कोणत्याही एका विशिष्ट साच्यात बसविता येत नाही; हेच खरे महत्त्वाचे आहे. मनाचे रंग काही स्थिर आणि शाश्वत नसतात. परिस्थिती व अवस्था बदलेल तसे ते बदलतात; ते बदलते रंग आपण रेणूच्या पात्रापासून ते साऱ्या पौर्णिमा, चौधरी, लोरेंझो या पात्रापर्यंत आविष्कृत केलेले आहेत. आणि त्यातूनच जीवनाच्या 'आतल्या' जीवनाचे रंगीत शोभादर्शक यंत्र पदोपदी बदलणाऱ्या स्वरूपात वाचकांना दाखविण्यात यशस्वी झालेले आहात !

आपल्या 'रेणू' या कादंबरीत मला वाटते; यापेक्षाही आणखी काही भावलक्षित करावयाचे असावे. देश, धर्म, व्यवसाय आणि वय यात भरपूर फरक असलेली समाजातली माणसे समूह रूपाने जेव्हा प्रसंगा-प्रसंगानी एकत्र येतात; तेव्हा त्यांच्यात निर्माण होणारी नाती कोणती ? त्या नात्याला अर्थ असतो काय ? त्यात अर्थपूर्ण आणि निरर्थक असे किती। असते ? अगदी रक्तानी जखडलेल्या माणसात देखील नाते नावाचा जो भावनिक बंध असतो तो खरोखर मना-मनाचे मीलन करण्यास उपयोगी ठरणारा असतो का ? आपली म्हणणारी; आपल्या सहवासात वावरणारी; संवादरूपाने मनाला कधीकाळी स्पर्श करणारी स्वदेशीय आणि परदेशीय माणसे यांच्या संबंधांना सामाजिक दृष्टचा अर्थ असून देखील तसा अर्थ नाही. ही सारी नाती निरर्थक असतात. परिचय, सहवास, संपर्क आणि स्नेह ही आपल्या भावजीवनाच्या आधार खुणा आपण मानतो. पण व्यापक दृष्टीने यालाही तसा अर्थ नाही. पृ. ७३ मध्ये तुम्ही स्वत:च तसे बरेच स्पष्टपणे सूचीत केलेले आहे. पृ. ८७ मध्येही अशाच प्रकारची संवादरचना आलेली आहे. रेणूच्या नाते मानतो त्याचा नेमका अर्थ काय ? त्याची स्पष्ट खूण शारीर ओढीत, शारीर आकर्षणात की मानसिक वात्सल्यात सामावलेली असते ? याचा आपण शोध घेण्याचा प्रयत्न स्वत: रेणू आणि चौधरी आणि प्रमिला यांच्यात निर्माण झालेल्या नात्यांतून अभिव्यक्त करण्याचा प्रयत्न केलेला आहे. एवढेच नव्हे तर जी गोष्ट नात्याच्या संबंधात जशी अस्पष्ट आणि मनोकल्पनांच्या पलीकडची आहे; तीच गोष्ट सहवास आणि संस्कार, परिचय यांचीही आहे. स्त्री-पुरुषांच्या भेटीगाठी म्हणजे सहवास काय ? पार्टीला जाणे सहवासात बसते काय ? शय्यासोबतीतून सहवास अथवा परिचय घडतो काय ? याची

अन्तर्मुख करणारी जाणीव आपण 'रेणू' कादंबरीतून साकार केलेली आहे. म्हटले तर या शब्दांना तसा अर्थच नाही. माणूस माणसाला बांधला जात नाही. आणि बांधलेला असला तरी त्याला एकलेपणा टाकता येत नाही. सोडून जात नाही अशा प्रकारचे माणसांच्या मनाची आणि त्याच्या जीवनअस्तित्वाच्या बाबतीत आपले भाष्य असावे. मला वाटते प्रामुख्याने 'रेणू' मध्ये हेच आपणाला दाखवावयाचे असावे.

या एकलेपणाचा केंद्रबिंदु तुम्ही संपूर्ण कादंबरीत ढळू दिलेला नाही. किंबहुना दुसऱ्या शब्दात एकलेपण– मनाचे, बाहेरचे– हेच या कादंबरीचे व्यक्त होणारे सामर्थ्यस्थान आहे. त्यामुळेच प्रमिला सर्व भौतिकसुखे हातांपायाशी लोळण घेत असूनही केवळ आजारामुळे एकलेपणाने जगते आहे. केवळ आजारपणामुळेही नव्हे तर मनच एकलेपणाने व्यापून उरलेले असते म्हणून ! वसंत बापटांच्या एका कवितेत "असुनी गलबला अवती–भवती, परी मी एकला, मी एकला" अशी जी खंत दाखविली आहे तीच 'रेणु' कादंबरीत प्रत्येक पात्राच्या बाबतीत निदान मला तरी जाणवते, या तुमच्या कादंबरीत प्रमिलेचे एकलेपण आहे आणि त्याचे स्वरूप व जात वेगळी आहे. जानकी एकलेपणाच्या ज्वालात साथीला–सहवासाला माणसे असूनही धगधगते आहे. 'रेणु'ला एकलेपणाने अखेरपणापर्यंत घेरलेले असते. तिच्या मनात तळाशी घट्ट गाळासारखे साचलेले एकलेपण शेवटपर्यंत तिचा पिच्छा पुरविते. तशी म्हटली तर ती एकटेपणाचे आयुष्य कधीच जगत नाही– दिल्लीत काय किंवा बाहेर परदेशात काय ? तरीही तिच्या मनाची पोकळी मात्र कोणत्याच उपायांनी भरून निघत नाही. यातला लोरेंझो हा देखील भारताशी एकरूप होऊन एकलेपणाच्या पिंजऱ्यात अडकलेला आहे. म्हणून आपणाला या कादंबरीतून मानवी जीवनाला जाणवणारे अनामिक एकलेपण; त्या एकलेपणातून निर्माण होणारी मनाची मरगळ; त्या मरगळीतून साकार होणारी विफलता आणि त्या विफलतेतून बाह्य भौतिक जीवनात सुखवर्षाव होत असताही मानवाची होणारी तडफड प्रामुख्याने अभिव्यक्त करावयाची असावी. हे एकलेपण आपण सहज आणि स्वाभाविक स्वरूपात चित्रित करता हे आणखी विशेष. कधीकधी ते तुम्ही तुमच्या खास स्टाइलमध्ये सहजपणे सूचित करून जाता. एकाचे 'एकलेपण' दुसऱ्याच्या सहवासात आले तरी दुसराही तसा रिताच राहतो; व सहवासात आलेलाही तसाच राहतो. एकलेपण विसरण्याचा नेटाने प्रयत्न करणारे पात्र म्हणजे जानकी; पण त्यासाठी ती जी मानवनिर्मित सुखसाधनांचा साधन म्हणून वापर करते; त्यामुळे तर ती अधिकच एकलेपणाने कोळपते. तिने स्वीकारलेले माध्यमच एकलेपणा

सतत जागा करीत असतो. रेणूचे एकलेपण तिलाच नीटपणे समजलेले नाही. पौणिमा गीते व भजनातून तिच्या जीवनाची पोकळी भरून काढण्याचा जानकीपेक्षा वेगळा मार्ग अनुसरूनही तिची ती पोकळी भरून निघत नाही. चौधरींच्या जीवनात तर ही पोकळी कमालीची जाणवते. म्हणून रेणू कादंबरी ही मानवाच्या जीवनात अपरिहार्यपणे निर्माण झालेले एकलेपण आणि त्यातून सुटका करून घेण्यासाठी प्रत्येकाने आपापल्या आवडी-नुसार केलेल्या प्रयत्नाची विफल कहाणी आहे असे मला तरी वाटते. नाही म्हणायला तुम्ही रेणूला थोडीफार जीवनाची समृद्धी कशी सापडते ते सूचित केलेले आहे. जीवनाबद्दल कसलीच कडूगोड अनुभूती नसलेली, बहुतांशी स्वप्नाळू मनोवृत्तीने जगणारी, आपल्या अबोध मनाचा शोध घेण्यासाठी धडपडणारी, जीवनातले काटे– कंगोरे तसे परिचित नसताही स्वतःच अन्तर्मुख होऊन देहाचा, प्रीतीचा, नाटचकलेचा, वेळेचा, सहवासाचा विचार करणारी रेणू पृ. ७९ वर तुम्ही वेगळचा पातळीवर दाखवली आहे. तेथे एकच वाक्य आहे. "रेणू आता कुणाचीच नव्हती" या वाक्यातून वरवर एकलेपणा सूचित केलेला असला तरी त्याचक्षणी तिला तो मार्ग सापडतो असे आपणास अभिप्रेत असावे ! त्यामुळे 'रेणू' कादंबरीतील 'रेणू' चे चित्रण सांकेतिक आणि साचेबंद स्वरुपाचे झालेले नाही. नेमक्या कोणत्या भावनांनी तिच्या मनाला उचलून वर घेतले हे तुम्ही मुद्दाम पण कलात्मक भान ठेवून लिहिलेले आहे. म्हटले तर कलेच्या उपासनेतून मिळणाऱ्या आनंददायी भावनेतून ! म्हटले तर शारीर आकर्षणाच्या न कळत जागृत झालेल्या ओढीतून ! म्हटले तर चौधरी–प्रमिलेच्या वात्सल्याचा स्पर्शाने ! किंवा म्हटले तर आधारासाठी लोरेंझो सारख्या 'आर्ष' माणसाच्या परिचिताकडून मिळालेल्या स्पर्शाने !

आपल्या 'रेणू' या ताज्या कादंबरीत आणखी एक गोष्ट मला तीव्रतेने प्रतीत झाली. माणसाचे या मातीवर साकारलेले अस्तित्व आणि त्याला समाज व सामाजिक संस्कार यांनी मारलेली मिठी माणसाला जगू देत नाही. त्यातून सुटण्याचा प्रत्येकजण आपापल्या परीने प्रयत्न करीत असला तरी तो एकाकी असतो. अस्तित्वाला वेढलेले हे सामाजिक किल्मिष एकाकी प्रयत्नाने कधीच कमी होत नाही हे आपणास या कादंबरीतून गर्भितस्वरूपात व्यक्त करावयाचे असावे. हे अस्तित्व व एकाकीपण नको–नकोसे वाटते. पण कधी कधी ते आकारहीन स्वरूपात घेरते; कधी रक्तात भिनूनच साथ आणि सोबत करीत असते. त्यामुळे मना–मनाचा आणि मना– देहाचा संघर्ष सतत झडत असतो. याचे प्रमिलेच्या रूपाने तुम्ही अतिशय सुंदर रीतीने चित्रण केलेले आहे. त्यामुळेच प्रत्येक पात्र तुम्ही कोणत्या तरी कलेचे उपासक दाखवले आहे.

पौर्णिमा गीत गाते. लोरेंझो चित्रकार आहे. जानकी साहित्यकलेत मग्न आहे आणि रेणू कविता करत असते. या कलेच्या उपासनेतून मानवाचे जखडलेले अस्तित्व थोडेफार सैल होते. मुक्त होते, खरे; पण कायमचे नाही. त्याला घट्ट करणारी कारणेही तशीच त्या अस्तित्वाबरोबर जन्माला आलेली असतात. त्यामुळे बद्ध अस्तित्व आणि त्यासाठी मानवाचा संकेत–संस्कार, परंपरा यांच्याशी होणारा संघर्ष यात पदोपदी जाणवतो. त्यामुळेच मानवाच्या बदलत्या मनाची आंदोलने सारखी बदलतात; त्याचे मन शब्दाच्या, स्पर्शाच्या वा नेत्राच्या चिमटीत पकडता येत नाही हे आपणास दाखवावयाचे असावे. ही बदलती आंदोलने दाखविताना तुम्ही समतोल साधलेला आहे. छायाप्रकाशाचे कवडसे एकमेकात कालवावे तसे पात्रांच्या हालचालीतून, घरातून, घरकामातून, साधलेला असल्याने ती वास्तवाच्या मातीवर पाय टेकून असली तरी इतर कादंबरीतल्या पात्राप्रमाणे वास्तवाच्या मातीपासून पूर्णतः तयार झालेली आहेत असे वाटत नाही. ‘बाह्या’चा हव्यास नि सहवास आणि ‘आंतराची’ आदिम ओढ याचे जवळ जवळ चित्रण करूनही आपण वास्तवतेला नवा रंग देण्याचा प्रयत्न केला नि जीवनाचा समतोलही सूचित केलेला आहे.

याचबरोबर स्त्री-पुरुषांच्या घडणीत व जगण्याच्या जाणिवेत मानवी देह व सहवासातून निर्माण झालेले आकर्षण त्याला नेमके प्रेमही म्हणता येत नाही. आणि आकर्षण शब्दही अपुरा पडतो– अशी ती आंतरिक ओढ यांचे जीवनातले स्थान व कार्यभाग कोणता, किती हे तुम्ही ‘रेणू’ मध्ये पृ. २७ वर व इतरत्र अनेक ठिकाणी दाखविले आहे. किंबहुना जानकी, चौधरी आणि पौर्णिमा या पात्रांची निर्मिती व जगण्याची त्यांची धडपड त्याच उद्देशासाठी आहे असे वाटण्याइतपत चित्रण झालेले आहे. पृ. ३२ वर रेणूविषयी चौधरींच्या मनात निर्माण झालेले भान शारीरिक गरजांच्या आणि सामाजिक बंधनाच्या संघर्षाची नव्हे मनाच्याही संघर्षाची सुरवात आहे असे दाखवून त्यावर तो उपाय नव्हे तर प्रमिलेच्या मृत्यूनंतर चौधरींनी पौर्णिमाबरोबर घालविलेले जीवन हा उपाय आहे असे तुम्ही उत्तरही सूचित केलेले आहे. त्यामुळे जीवनात स्त्रीचा पुरुषाकडे व पुरुषाचा स्त्रीकडे पाहण्याचा दृष्टिकोन कसा असतो. प्रत्येकजण ‘आपल्यातून’ दुसऱ्याला पाहण्याचा प्रयत्न करतो. त्यामुळे रेणूमध्ये स्त्री-पुरुषांच्या तरल नात्याची स्पंदने व मनाचे बदल व्यक्त करण्याचा तुमचा प्रयत्न खूपच यशस्वी झालेला आहे. जीवन आणि त्याला सावलीसारखी कायमची साथ आणि सोबत करणारी प्रीती हा तुमच्या प्रतिभेच्या चिंतनाचा आवडता भाग! प्रीतीचे स्थूल, बटबटीत आणि एकेरी, सांकेतिक चित्रण करणे तुम्हास कधीच मानवले नाही हे अगदी तुमच्या काव्यावरून नि कादंबरीवरून देखील जाणवावे! त्या प्रीतीच्या तरल-सूक्ष्म

अनुक्रमणिका

छटा दाखवण्यात तुम्ही अधिक रमता. एखाद्या प्रीतीच्या तरलतम संवेदनांनी जाळीदार झालेल्या अवस्थेचा अनेक संदर्भसूचक अशा अल्पाक्षरी शब्दांतून व्यक्त करण्याचे कसब तुमच्या प्रतिभेत खूप! त्यासाठी शब्दांच्या वापरून गुळगुळीत झालेल्या बाह्य कवचांचा तुम्ही धिक्कार करता आणि शब्दांच्या गाभ्यातला ताजा, नवा स्तिमित करणारा रस त्याच स्वाभाविकतेतून मुळच्या अंगभूत रूपासह आविष्कृत करता. आपल्या प्रतिभेचे हे वेगळेपण 'रेणू या कादंबरीतही पुनः पुन्हा जाणवते. ज्याला प्रीतीही म्हणता येऊ नये आणि दुसरे तत्सदृश भावनिक नाते सांगणारा शब्दही सापडू नये अशी एका नव्या संवेदनांची-अनुभूतींची एकाच वेळी विहार करणारी आणि मनाच्या विविध अवस्थांचा साक्षात्कार घडविणारी, अस्पष्ट असलेली म्हणूनच अधिक उत्सुकता निर्माण करणारी तरल संमिश्र अनुभूती आपण पात्रांच्या बारीक-सारीक कृतींच्या, संवादाच्या साहाय्याने अभिव्यक्त करता. वरवर पाहता हे सारे निरर्थक वाटते. पण त्याच्या पोटातच 'अर्थकत्व' दडलेले असते हे खूप उशीरा समजते. 'रेणू' कादंबरीत अशा प्रकारची संमिश्र प्रीतिसदृश संवेदना शब्दांच्या पलीकडे गेल्यावर समजते. त्या दृष्टीने प्रकरणाच्या शेवटची वाक्ये मोठी बोलकी वाटतात. त्यातूनच अधिकांशाने आपणाला हे कसब साधलेले असते. एका ठिकाणी तुम्ही लिहिता, "प्रत्येकाला ज्याचा त्याचा भाग देऊन टाकायचा, मोकळं व्हायचं, विसरून जायचं" अशा प्रकारची भाषाच 'रेणू'ला भावनिक आणि भाषिक व्यापकतेच्या दृष्टीने अधिक उंचावते. भावार्थाची एकापेक्षा अधिक वलये निर्माण करते.

आणखी एक सहज सुचणारी गंमत म्हणजे आपल्या या कादंबरीतील बहुतेक सारी पात्रे कलावंताच्या जातकुळीत मोडणारी आहेत. अशीच पात्रे का व कशी एकत्र आली असला प्रश्न विचारणे थोडेफार भाबडेपणाचे म्हणावे लागेल. पण मनात एक विचार तरळून जातो की, तुम्हाला असे दाखवावयाचे तर नाही ना; कलावंतानाच जीवनाचे एकलेपण अधिक तीव्रतेने छळते? किंवा तुम्हाला असे तर म्हणायचे नाही ना की, या एकलेपणातून आणि त्यातून सुटका करून घेण्यासाठी केलेल्या सहवासातूनच कलावंताला जीवनाचे मोकळे, ताजे, आणि नवे दर्शन घडते? 'रेणू'च्या व आपल्या मनात नेमका कोणता आशय असेल तो असो; पण मानवी जीवनाचे आतून पोकळ झालेले रितेपण आणि अस्तित्व आणि मानवसमूह याना निसर्गतः दिलेल्या भावनावासनांचा तरलपणा यांना तुम्ही प्रथमतःच शब्दांकित करीत आहात यात शंका नाही. म्हणूनच 'रेणू' कादंबरी ही सावित्रीची धाकटी बहीण शोभावी इतकी मराठी कादंबरीत वेगळेपणाने उठून दिसेल असे मला मनापासून वाटते.

— प्रा. द. ता. भोसले